# आपण पुनः पुन्हां जन्मास येतों काय ?




लेखक

राजाराम सखाराम भागवत

किंमत दीड रुपया

# आपण पुनःपुन्हा जन्मास येतों काय ?

लेखक

**राजाराम सखाराम भागवत,** एम् ए

सिद्ध पुरुष व त्याचा सांप्रदाय'; 'राजयोगाची मूलतत्त्वे व अभ्यास';
'मृत्यु व मृत्यूनंतर', 'महाराष्ट्रातील संत व त्यांचे
साक्षात्कार', 'ईश्वर आहे की नाही', 'मरणोत्तर
स्थिति व परलोकविद्या', 'बेझंट चरित्र'
वगैरे ग्रंथाचे कर्ते

व

**मराठी थिऑसफिकल फेडरेशनचे अध्यक्ष**

**किंमत दीड रुपया**

# प्रस्तावना

माणूस पुनः पुन्हा जन्म घेतो की नाही या प्रश्नाचें विवेचन या पुस्तकात केलेले आहे पुनर्जन्माच्या सिद्धाताला अनेक बाजू आहेत या छोटया पुस्तकात त्या सर्व बाजूचा ऊहापोह करता आलेला नाही मुख्यत पुनर्जन्माच्या कल्पनेचे स्पष्टीकरण करून व पुनर्जन्माविषयी अनेक प्रकारचा पुरावा दाखल करून पुनर्जन्माचा सिद्धात खरा आहे, आपणा सर्वाचे पूर्वी अनेक जन्म झाले असून पुढेही अनेक जन्म व्हावयाचे आहेत ही गोष्ट या पुस्तकात सिद्ध करून दाखविण्याचा यत्न केलेला आहे माणसाला पुनर्जन्माचा सिद्धात समजला व खरा वाटला म्हणजे त्याची जीवनातील सर्व प्रश्नाकडे पहाण्याची दृष्टि बदलते, व त्याचा उत्साह वाढतो. आपण मेलो तरी पुन अनेकवार जन्मास येऊन आपल्या नाना सामर्थ्याची चौफेर वाढ करण्याची सधि आपणास पुन पुन्हा मिळणार आहे हे त्यास उमजते सध्या आपण ज्याशी प्रेमरज्जूने बाधले गेलो आहो, त्यासही पुन पुन्हा जन्म यावयाचे असून आपल्या त्याच्या गाठी जास्त घट्ट बाधल्या जावयाच्या आहेत याची त्याला कल्पना येते. आपण केलेले उद्योग कधींही फुकट जात नाहीत, त्याची फळे प्रस्तुत जन्मी आपल्या पदरात न पडली तरी पुढे पडतील याचा त्याला विश्वास येतो. वाईट वर्तनाचे प्रायश्चित्त आज जरी न मिळाले तरी ते पुढे चुकविता येणार नाही हे समजून आल्यामुळे तो जास्त जबाबदारीनें वागतो ही नवीन दृष्टि येण्याकरिता, माणसाला अनेक जन्म यावे अशी सृष्टीची योजना आहे, हा सिद्धात त्याला समजावून देणे जरूर आहे जिज्ञासू वाचकासमोर निरनिराळीं प्रमाणे देऊन ह्या सिद्धांताचा खरेपणा त्यास पटवून द्यावा व जीवनाकडे पहाण्याची ही एक वेगळी दृष्टि त्यांच्या अतर्यामांत उत्पन्न करावी

या धोरणाने हे पुस्तक आम्ही लिहिलेले आहे म्हणूनच या पुस्तकात पुनर्जन्मवाद खरा आहे हे दाखविण्याकरता निरनिराळ्या प्रकारची नवी जुनी प्रमाणे आम्ही प्रामुख्याने दिली आहेत

हे पुस्तक आटोपशीर व्हावे अशी आमची मनीषा असल्यामुळे पुनर्जन्माविषयीचे अनेक प्रश्न या पुस्तकात आम्ही समाविष्ट केलेले नाहीत जगातील सर्व धर्मांना पुनर्जन्माचा सिद्धान्त मान्य आहे व तो त्या धर्मांनी कमी अधिक स्पष्टपणाने आपापल्या धर्मग्रथात दिला आहे असे आमचे म्हणणे आहे या गोष्टीचा ओझरता उल्लेखच काय तो आम्ही या पुस्तकात करू शकलो आहो पण त्याबद्दल विस्तृत व साधार चर्चा आम्हास करता आलेली नाही माणसाचा जन्म तिर्यग् योनीत होतो की नाही व पुरुषाला स्त्रीचा आणि स्त्रीला पुरुषाचा जन्म येतो की काय, एका जन्मातील वर्तणुकीचा परिणाम दुसऱ्या जन्मात होतो की नाही वगैरे अनेक प्रश्नाची विस्तृत चर्चा या छोटया पुस्तकातून मुद्दाम गाळावी लागली आहे पुनर्जन्माचा सिद्धात पटला, तरच त्याची चर्चा उपयुक्त होईल प्रस्तुत पुस्तकात तो सिद्धान्त बुद्धिवादी माणसाला पटवून देण्याचा आम्ही प्रयत्न केला आहे, व वरच्यासारखे या पुस्तकात न आलेले प्रश्न एका स्वतत्र पुस्तकात जिज्ञासूसमोर ठेवण्याचा आमचा मनोदय आहे.

ठाणे,
गणेश चतुर्थी
शके १८७७

**राजाराम सखाराम भागवत**



# अनुक्रमणिका.

## वाचनीय वाङ्मय

'पुनर्जन्म' ह्या विषयावर जी वाचनीय पुस्तके आहेत त्यापैकी अनेकाचा उल्लेख प्रस्तुत पुस्तकात जागजागी (विशेषत तळटिपांत) केलेला आढळेल

Ralph Shirley कृत Problem of Rebirth या पुस्तकात चागल्या प्रकारचा पुनर्जन्मविषयक पुरावा आहे E. D. Walker कृत A Reincarnation व Pascal कृत Reincarnation या पुस्तकातही पुरावा आहे; पण ती पुस्तके जुनी आहेत Hodson कृत Reincarnation Fact or Fallacy व Powell कृत Rationale of Reincarnation या पुस्तकात या विषयाचे सामान्य जिज्ञासूकरिता सुलभ विवेचन आहे. Dr Besant याची जी The Ancient Wisdom व Popular Lectures on Theosophy नावाची पुस्तके आहेत त्यांत पुनर्जन्माविषयी चागल्या प्रकारचे विवरण आलेले आहे डॉ बेझट याचे Theosophical manual न २ या पुस्तकाचे नाव Reincarnation असून तेही वाचनीय आहे पण परिभाषा जुनी आहे. पावरी कृत Theosophy Explained या पुस्तकात पुनर्जन्मावर एक प्रकरण आहे व त्यात विविध प्रकारची माहिती व प्रश्न आहेत पुनर्जन्माच्या नियमाची माहिती जिनराजदास कृत The First Principles of Theosophy या पुस्तकातील एका प्रकरणात व लेडबीटर कृत Text book of Theosophy या पुस्तकात सापडेल The Lives of Alcyone खड १ व २ (बेझट–लेडबीटर कृत) व The Soul's Growth through Reincarnation या नावाच्या चार पुस्तकात निरनिराळ्या व्यक्तीच्या पूर्व जन्माचा इतिहास आहे व त्यात मधून मधून कित्येक कठीण प्रश्नाचे विवेचन केलेले आहे पुनर्जन्माच्या दृष्टीने इतिहासांतील घडामोडी कशा दिसतात याचे विवरण जिनराजदास कृत Theosophy and modern Thought या पुस्तकातील History in the Light of Reincarnation या पुस्तकात आहे

प्रकरण १ लें

# विषय-प्रवेश

मनुष्याला एकच जन्म असतो, की अनेक असतात? मनुष्य पुन. पुन. जन्म घेतो की नाही? हे प्रश्न गहन आहेत. त्याचा विचार या पुस्तकात करावयाचा आहे, तो श्रद्धेने न करतां चौकस दृष्टीने करावयाचा आहे. तेव्हा हा विषय सुबोध व स्पष्ट होण्याकरिता 'पुनर्जन्म' म्हणजे काय त्याचा खुलासा प्रथम-दर्शनीच करणे जरूर आहे.

## पुनर्जन्म म्हणजे काय?

मनुष्याला मरणोत्तर अस्तित्व असतें की नाही व मनुष्याला पुनर्जन्म असतो की नाही हे प्रश्न परस्परसल्लग्न असले तरी ते एकच नाहीत. जर माणसाला पुनर्जन्म असला तर त्याला मरणोत्तर अस्तित्व आहे असें मानणें भाग आहे. कारण मनुष्य मेल्यानंतर जर त्याचा सर्व कारभार आटपत असेल तर त्याला पुन: जन्म येण्याचा प्रश्नच उद्‌भवणार नाही. मृत्यूनतर जर त्याचा काही अंश शिल्लक रहात असेल तरच पुनर्जन्माची शक्यता असावयाची हें उघड आहे, पण मृत्यूनतरही माणसाचा काही अंश शाबूद असतो असे कबूल केले म्हणजे पुनर्जन्माच्या सिद्धातास मान्यता दिली असें होत नाही. हल्लीचे ख्रिश्चन, मुसलमान व पारशी लोक जीवाचें मरणोत्तर अस्तित्व मान्य करतात, पण पुनर्जन्म मान्य करीत नाहीत. माणसास (जीवास)

मरणोत्तर अस्तित्व असतें व तो जडद्रव्याचा नवा दृश्य देह घेऊन पृथ्वीवर किंवा तत्सम परिस्थितीत पुन. येत असतो, इतके ज्याला कबूल असेल त्यालाच पुनर्जन्मवाद मान्य आहे असे म्हणता येईल.

पुनर्जन्म घेणे म्हणजे हाडामासाचा किंवा तत्सदृश नवा देह घेऊन भूलोकांत किंवा तत्सम परिस्थितीत येणे, व त्या परिस्थितीत जे जे व्यवहार त्या देहाला करणे शक्य आहे ते ते करणे असा अर्थ आहे एकादा नट शाकुंतल नाटकात स्त्रीवेषानें रंगभूमीवर येऊन शकुंतलेची भूमिका करील. तोच नट नंतर उत्तररामचरितात पुरुषवेषाने रामाची वा लक्ष्मणाची भूमिका घेईल. नट तोच, पण एका वेळी तो पैठणी नेसून स्त्री म्हणून प्रेक्षकांसमोर येतो दुसऱ्या वेळी भरजरीचा मखमाली अंगरखा अंगावर चढवून व राजा होऊन नाटकातील औटघटकेचे राज्य करतो व तिसऱ्या वेळी फाटके व घाणेरडे कपडे घालून भिकाऱ्याची भूमिकाही घेऊ शकतो तद्वत् तोच मनुष्य (तोच जीव) सुंदर वा कुरूप, सशक्त वा रोगी, कर्तृत्ववान् वा आळशी असे दृश्य देह अनेकदा घेऊन जर जगात वावरत असेल तर तो पुन. पुन: जन्म घेत आहे असे म्हणता येईल मनुष्य मेल्यावर त्याचा जीव शिल्लक रहावा, त्या जीवाने दृश्य द्रव्याचा दुसरा भलाबुरा देह घेऊन आपल्या ह्या पृथ्वीवर किंवा पृथ्वीसारख्या अन्य स्थळी व्यवहार करण्यासाठी पुन यावे—या प्रक्रियेला 'पुनर्जन्म' असे म्हणतात.

यावरून दिसून येईल की ध्रुव नावाचा राजपुत्र (प्रचलित आख्यायिकेप्रमाणे) आकाशात तारा होऊन बसला आहे, म्हणजे त्याचा पुनर्जन्म झाला आहे असे म्हणता येणार नाही. कारण दृश्य द्रव्याचा देह घेऊन तो पृथ्वीवर अथवा तत्सम परिस्थितीत व्यवहार करीत आहे असे ती आख्यायिका सांगत नाही. कांही लोक मानतात की ज्या माणसाच्या इच्छा जिवंतपणी

अतृप्त राहिलेल्या असतात ती माणसे मृत्यूनतर पिशाच्च योनींत जन्मतात; व मरणोत्तर झाडावर येऊन बसतात. हे खरे मानलें तरी या क्रियेलाही पुनर्जन्माच्या सदरात घालता येणार नाहीं. कारण दृश्य द्रव्याचे देह त्या पिशाच्चानी घेतलेले नसतात. 'आत्मा वै पुत्र नामासि' या वचनाचा आधार घेऊन मुलगा हा बापाचा पुनर्जन्म होय असें कांही लोक प्रतिपादितात. पण बाप व मुलगा हे दोघे एकाच्च वेळी जिवत असू शकतात. अर्थात् त्या वेळी दोघाचे जीव वेगवेगळे असतात तेव्हा एकाचा (बापाचा) मृत्यु होऊन त्याच्या जीवाने दुसऱ्याचा (मुलाचा) जन्म घेतला असें म्हणतां येत नाही. म्हणजे मुलाला बापाचा 'पुनर्जन्म' असें म्हणतां येणार नाही. बापाच्या रक्तापासून मुलाचा देह होत असतो यासाठी हे लोक मुलगा हा बापाचा 'पुनर्जन्म' होय असें म्हणत असतात, ते योग्य ठरविल्यास ज्या बापाला (आणि आई-लाही) अनेक मुलगे व मुली असतील त्या बापाने (आणि आईनेही) एकाच वेळी अनेक जन्म घेतले आहेत असे म्हणण्याची पाळी येईल! पुनर्जन्म शब्दाचा हा दुरुपयोग होय एकाद्या प्राण्याचे मांस खाऊन जर कोणी धष्टपुष्ट बनला किवा एकाद्या माणसाच्या मृत देहाचें खत तयार होऊन जर त्याने एकादे झाड पोसले गेलें, तर तो माणूस त्या प्राण्याचा पुनर्जन्म आहे अथवा ते झाड त्या माणसाचा पुनर्जन्म आहे असे म्हणणे, ह्याही पुनर्जन्म शब्दाचा दुरुपयोग होय.

माणसाला पुढचा जन्म आहे असे जो म्हणेल त्याला न्यायतः कबूल करावें लागेल की माणसाला मागचाही जन्म असला पाहिजे. जर माणूस पुन पुन्हां अनेकवार जन्म घेऊन येत असेल तर (अपवाद वगळल्यास) त्याच्या सध्याच्या जन्माच्या अगोदर आणि नतर दुसरे जन्म असले पाहिजेत असे मानणे ओघासच येतें. ख्रिश्चन धर्मातील विशिष्ट माडणीमुळे ही सर्वांस उघड दिसणारी गोष्ट कित्येक ख्रिश्चन लोकास पटत नाही. ते विशिष्ट अर्थानें

पुढचा जन्म मानतात; पण पूर्वीचा जन्म मानीत नाहीत.[१] असला घोटाळा करणारे लोक आमच्या वाचक वर्गांत असणार नाहीत असें आम्ही धरून चालतो. या पुस्तकात 'पुनर्जन्म' या सज्ञेत पूर्वजन्मही समाविष्ट आहे हे मुद्दाम सागण्याची आवश्यकता नाही.

## पुनर्जन्म व जगांतील धर्म

माणसाला अनेक जन्म असतात की नाही ? हा आपणा-समोरचा विवाद्य प्रश्न आहे. त्याबद्दल हिंदु धर्म काय सागतो ? माणसाला पुष्कळ जन्म येतात असे सागतो. 'बहूना जन्मनामन्ते ज्ञानवान् मा प्रपद्यते ।' असे गीता सागते. उपनिषदेही तेच प्रति-पादतात. बुद्ध धर्मातही हा अनेक जन्माचा सिद्धान्त दिलेला आहे जैन धर्मालाही तो समत आहे

जगातील इतर धर्मांत पुनर्जन्माचा सिद्धान्त हिंदु धर्मा-इतका स्पष्टपणे सागितलेला नसला तरी त्या धर्मानाही तो मुळात पूर्वी मान्य होता असे अभ्यासूचे म्हणणे आहे.[२] एलिअॅस हा जॉन धि बॅप्टिस्ट याचा जन्म घेऊन आलेला आहे असे बायबलात विधान केलेले आहे.[३] ज्यू लोकाचा जो कबाला नामक गूढ-वादाचा ग्रथ

१ या मुद्द्याची चर्चा J. Ellis Mac Taggart कृत Human Immortality and Pre-existence (1916) या पुस्तकात आहे.

२ या मुद्द्याबद्दल जास्त विवेचन या छोट्या पुस्तकात करण्यास स्थळ नाही पुनर्जन्मवादावर आणखी एक पुस्तक लिहिण्याचा आमचा मनोदय आहे त्यात ख्रिश्चन, ज्यू, मुसलमान व पारशी याच्या धर्मग्रथातील आधारभूत वचनें देऊन त्यानाही पूर्वी पुनर्जन्मवाद समत होता असे आम्ही दाखवून देणार आहो

३ जॉन धि बॅप्टिस्ट याला अनुलक्षून ख्राइस्ट सागतात If you will receive it, this is Elias which was for to come ( Matthew 11, 14. )

आहे त्यांतही पुनर्जन्मवाद आहे.[१] कुराणातही पुनर्जन्माचे उल्लेख आहेत, व सुफी लोकाना आजही पुनर्जन्मवाद मान्य आहे.[२]

पुनर्जन्माचा जो हा विवाद्य प्रश्न आहे, त्याबद्दल जगातील निरनिराळ्या धर्मांचें काय म्हणणे आहे त्याचा थोडक्यात वर उल्लेख केलेला आहे या मताच्याविरुद्ध कोणी आहेत का ? असले तर ते काय म्हणतात ? त्याची आपण चवकशी करू या म्हणजे दोन्ही बाजू ऐकून व दोन्ही बाजूचा पुरावा हिशेबात घेऊन आपणांस या प्रश्नाचा निर्णय करता येईल.

---

१ The Soul of Adam passed into Moses and then into David असे कबालातील वचन आहे. Hastings कृत Encyclopaedia of Religion & Ethics या कोशात खंड १२ पृ. ४३५ वर Transmigration ( Jewish ) या सदराखाली जे विवेचन आहे त्यात ज्यू धर्मात पुनर्जन्मवाद होता असे विधान केलेले आहे.

२ उदाहरणार्थ कुराणातील सुरा ३०, रूम्, आयात १९ चें रॉडवेलने पुढील भाषांतर दिले आहे : He bringeth forth the living out of the dead and he bringeth forth the dead out of the living. नादरबेग के मिरझा या ग्रंथकाराने Reincarnation in Islam नावाचे जें पुस्तक लिहिले आहे त्यांत मुसलमानी धर्मांत व कुराणांत मूळचा पुनर्जन्म आहे असे त्यानें प्रतिपादिले आहे.

डॉ. ॲनी बेझंट यानी The Universal Text Book of Religion & Ethics हे पुस्तक प्रसिद्ध केलेलें आहे, व त्यात त्यानीं लिहिलें आहे की जगातील सर्व धर्मांत तेच तेच सिद्धान्त दिसून येतात पुनर्जन्मवादास मान्यता देणारीं निरनिराळ्या धर्मांतील अधिकृत वचनें त्यानीं त्या पुस्तकात एकत्र दिलीं आहेत.

## प्रकरण २ रें

# विरुद्ध बाजू

मागील प्रकरणांत आपण थोडक्यांत पाहिले की सर्व धर्मांत पुनर्जन्मवाद आहे, मग तो स्पष्टपणें माडून त्यावर काहींनी विशेष जोर दिला असेल, तर कित्येक धर्मात त्याला बेताबाताचेच महत्त्व मिळालेले असल्याने आज तो त्यातून नष्टप्राय झाला असेल. जगातील अनेक मोठमोठ्या माणसासही पुनर्जन्मवाद मान्य होता असें दाखविता येण्यासारखे आहे. कालिदासासारख्या अनेक कवींनी पुनर्जन्म मान्य असल्याचे आपल्या काव्यात अनेक उल्लेख दाखल केले आहेत. बाणभट्टासारख्या काही कादबरीकारानी पुनर्जन्माच्या तत्त्वाचा आधार घेऊन त्यावर आपल्या कथाची सविधानकेंही उभारली आहेत प्लेटो, पायथॅगोरस, लउत्स, वात्स्यायन, शोपेनहॉएर वगैरे अनेक तत्त्ववादी पुरुषांनी आपल्या तत्त्वज्ञानात पुनर्जन्मवादास मान्यता दिलेली आहे. पुनर्जन्मवाद मान्य असणाराची आपण यादी करावयास बसलों तर जगांतील धर्मांचे सर्व संस्थापक आपणाला त्या यादीत घालावे लागतील, इतकेच नव्हे तर पाश्चिमात्य व पौर्वात्य देशातील किती तरी बुद्धिमान् व प्रतिभावान् माणसाचा समावेश त्या यादीत करणे भाग पडेल हे बहुश्रुत वाचकांस सागणें नकोच.

'माणसाला पुनर्जन्म आहे' हें मत जसे या थोर पुरुषांनी प्रतिपादिलें आहे तसे 'पुनर्जन्म नाही' असे म्हणणारे कोणी आहेत

काय ? होय आहेत. अर्थात् हे लोक कोण आहेत व त्यांचें म्हणणें काय आहे याचा विचार आपणास केला पाहिजे.

## बहुजनसमाजाचीं मतें

आजचे मुसलमान, आजचे ख्रिश्चन, आजचे पारशी, आजचे यहुदी हे माणसाला पुनर्जन्म नाही असें म्हणतात. पुनर्जन्म नाही असे म्हणणाऱ्या या धर्मातल्या अनुयायाची खानेसुमारी घेतली तर ती पुष्कळच भरेल. पण या लोकांनी पुनर्जन्मवादाचा विशेष विचार केला आहे व त्यावरून पुनर्जन्म नाही असे आपले मत ठरविले आहे असा प्रकार बिलकुल नाही. आपल्या धर्मांत पुनर्जन्म नाही अशी त्याची खरी वा खोटी समजूत आहे व त्यांच्यामध्ये आज पुनर्जन्माची कल्पना रूढ नसल्यामुळे ते पुनर्जन्म नाहीं असे म्हणतात इतकेच. एकाद्या अज्ञ व विचारहीन हिंदूला "पुनर्जन्म आहे की नाही" असे विचारले तर तो "आहे" असें उत्तर देईल कशावरून ? असे आणखी विचारले तर हिंदुधर्मांत पुनर्जन्म सांगितला आहे असे तो म्हणेल. त्या हिंदूला कोणी जबरीनें मुसलमान केला व त्याच्या मुलाबाळाना मौलवीसाहेबांनी धर्मशिक्षण देऊन ती मोठी झाली आणि त्याना कोणी विचारलें कीं, "पुनर्जन्म आहे का ?" तर ती नाही असे उत्तर देतील, व कां असे आणखी विचारल्यावर "मौलवीसाहेब नाही म्हणतात" असें सांगतील. या मुलाच्या मुलाना जर हिंदुमहासभेने किंवा आर्यसमाजाने परत हिंदुधर्मात घेतले व हिंदु वातावरणात ती मुले लहानाची मोठी झाली, क्वचित् कदाचित् कथाकीर्तने त्याच्या कानावरून गेली आणि मग त्याना कोणी विचारले की पुनर्जन्म आहे का ? तर ती आहे म्हणून म्हणतील व हिंदुधर्माकडे बोट दाखवितील. यावरून उघड आहे की अज्ञ लोकाच्या अमल्या मताला बिलकुल किंमत नाही. जगातील बहुतेक माणसे अज्ञ असतात व रूढ मतें सहजासहजी ग्रहण करतात. विलायतेस जसे रूढि म्हणून लोक

हॅट घालतात व महाराष्ट्रात रूढि म्हणून धोतर किंवा लेहंगा नेसतात, तसाच हा प्रकार आहे कोणते कपडे जास्त उपयुक्त याचा फारसा कोणीही विचार केलेला नसतो. तद्वत् कोणती धर्ममते जास्त सयुक्तिक आहेत याची बहुजनसमाज पचाईत करीत नाही. जी धर्ममते रूढ असतील ती तो बिन-तक्रार उचलून घेत असतो. अर्थात् असल्या अज्ञानमूलक मताचा येथे विचार करण्याचे कारण नाही अज्ञानी हिंदूने पुनर्जन्म आहे म्हटले व अज्ञानी ख्रिश्चनने तो नाही म्हटले तरी त्या दोघाची किंमत जवळ जवळ शून्यच हे उघड आहे

मागच्या प्रकरणात आपण निरनिराळ्या धर्मांची थोडक्यांत मतें दिली आहेत, व माणसाला पुनर्जन्म असतो असे त्या सर्वांचे सांगणे असल्याचे दाखविले आहे त्या धर्मांतील सध्याचे अज्ञ अनुयायी घेतले तर पुष्कळ जण पुनर्जन्म आहे असे म्हणतील व पुष्कळ जण तो नाही असे म्हणतील. पण हा प्रश्न मते मोजून ठरविण्याचा नाही, तर प्रमाणाचे वजन करून ठरविण्याचा आहे तेव्हा थोर व विचारी धर्मसंस्थापकाच्या मताविरुद्ध जरी आजच्या ख्रिश्चन, मुसलमान, पारशी, यहुदी बहुजनसमाजाचे मत असले तरी त्याकडे लक्ष देण्याचे कारण नाही

## भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुत.?

पुनर्जन्म नाही असे म्हणणाराचा हा वर्ग सोडला तरी 'भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमन कुत ।' असे विचारणारी पुष्कळ स्वतंत्र विचाराची माणसे सध्या जगात आम्हास आढळतात ही माणसेंही पुनर्जन्म नाही असे मत देत असतात या माणसाचे म्हणणे असे असते की ज्या मनुष्याला आपण जाळून टाकून त्याची रक्षा केली, किंवा ज्याला पुरून टाकून कृमिकीटकाच्या भक्ष्यस्थानी दिले, तो पुन. परत येईल हे शक्य नाही कागदाचे चिटोरे दिव्यावर धरून जाळले तर तें नाहीसे होते. दिव्याच्या

ज्योतीवर फुकर घालून ती मालविली म्हणजे तीही नाहीशी होते तद्वत् माणूस मेला आणि मग त्याला जाळले किंवा पुरले म्हणजे त्याचा नाश झाला कागद जसा परत येत नाही, मालविलेली ज्योति जशी पुन उत्पन्न होत नाही, तसा तो माणूसही परत येणे शक्य नाही अर्थात् माणसाला पुनर्जन्म नाही

पुष्कळ स्वतंत्र मताची माणसे जरी असे म्हणत असली, तरी हा युक्तिवाद टिकण्यासारखा नाही हे थोडयाशा विचारान्ती कोणालाही दिसून येण्याजोगे आहे. जे लोक माणसाला पुनर्जन्म आहे असे म्हणत असतात ते माणसाचा मेलेला देह पुन परत येतो असे बिलकुल म्हणत नाहीत जो देह भस्मीभूत झाला, त्याचे पुनरागमन होईल असे पुनर्जन्मवाद्याचे कधीच म्हणणे नव्हते, व नाही माणसाचा देह जाळला की त्यातल्या काही भागाचा कार्बन डायॉक्साईड नावाचा गॅस होतो व तो हवेत सर्वत्र पसरून जातो; काही भाग वाष्पीभूत होऊन तोही हवेत मिळतो, दुसरेही वायु तयार होऊन तेही अतराळात जातात त्याच्या देहाची जी राख उरते, तसेच ज्या अस्थि मागे राहिलेल्या सापडतात त्यास लोक वहात्या पाण्यात टाकून देतात पुनर्जन्म मानणारी माणसे इतकी मूर्ख खास नाहीत की हवेवर तरगत जाऊन सर्वत्र फाकलेले हे वेगवेगळ्या गॅसचे परमाणू, पाण्यात विरघळलेली ही रक्षा, व नदीच्या तळाशी बसलेल्या अस्थि पुन एकत्र होऊन पूर्वीचा तो माणसाचा देह पुन उत्पन्न होतो असे ती मानतील. पुनर्जन्म मानणारी माणसे व पुनर्जन्म न माणणारी माणसे ह्या दोघाचेही मत देहनाशाच्या बाबतीत एकच आहे.

पुनर्जन्म मानणाऱ्या लोकाचे म्हणणे असे आहे की जरी देहाचा नाश झाला, तरी प्रत्येक माणसामध्ये असा कांही भाग शिल्लक असतो की त्याचा नाश होत नाही. देह नाहीसा झाल्यावरही हा भाग पूर्ववत् शाबूद असतो. या भागाला कोणी 'जीव' म्हणतात, कोणी ' जीवात्मा ' म्हणतात, कोणी ' आत्मा ' हा शब्द

योजतात. त्याला मन म्हटलें, किंवा 'माणसाचा शाश्वत अंश' असें म्हटले तरी चालेल. हा शाश्वत अंश नवीन देह घेऊन आला म्हणजे पुनर्जन्म झाला असे पुनर्जन्मवादी लोक म्हणत असतात. एखाद्या खादीला एक पान असले व ते पान गळून त्या ठिकाणी दुसरे नवे पान आले, किंवा एखाद्या पुस्तकाचे कव्हर फाटले म्हणून त्याला नवीन कव्हर घातले म्हणजे जशी स्थिति होते तशी पुनर्जन्माच्या वेळी स्थिति असते नवीन पान आले तरी खादी जुनीच असते नवीन मळपृष्ठ घातले तरी पुस्तक पूर्वीचेच असते तद्वत् माणसातील शाश्वत अंश जुनाच असतो. पण त्याला देहरूपी नवा पेहराव येत असतो देहाची रक्षा झाल्यामुळे पुनर्जन्म शक्य नाही असे मानणे, म्हणजे जुने कव्हर फाटल्यामुळे नवीन मळपृष्ठ घालून ते पूर्वीचे पुस्तक पुन दृश्य होणार नाही असे म्हणण्यासारखे वेडेपणाचे आहे यावरून दिसून येईल की पुनर्जन्म नाही असे म्हणणारी जी ही मंडळी आहेत, त्याच्या मनात पुनर्जन्म म्हणजे काय याविषयी गैरसमज आहे व म्हणूनच ही त्याची विचारसरणी चुकीची होत आहे.

## नकाराची जबाबदारी

कोणतीही गोष्ट नाही म्हणण्यात एक विशेष जबाबदारी असते हे लक्षात ठेवले पाहिजे. 'आहे' म्हणण्यापेक्षा 'नाही' म्हणण्यांत जास्त जबाबदारी असते. "पुण्यास सोनचाफ्याची फुले आहेत" आणि "पुण्यास सोनचाफ्याची फुले नाहीत" ही दोन परस्परविरोधी विधाने आहेत सकृद्दर्शनी माणसाला असें वाटण्याचा संभव आहे की ह्या दोन्ही विधानापैकी कोणतेंही सिद्ध करावयाचे झाले तरी त्याला सारखाच पुरावा लागेल. पण खरोखरी तसें नाही 'पुण्यास सोनचाफ्याची फुलें आहेत' हे विधान करण्यापूर्वी माणसाने पुण्यातील एखाद्या बागेत एका सोनचाफ्याच्या झाडावर दोन फुले पाहिली असली तरी ते

पुरें होईल. ‘ पुण्यास सोनचाफ्याची फुले नाहीत ’ असें म्हणावयाचें असल्यास माणसाला यच्चयावत् सर्व पुणे शहर धुंडाळावें लागेल व कोठेही सोनचाफ्याचें फुललेले झाड आढळले नाही तरच तसे नास्तिपक्षी विधान करता येईल. सर्व पुणे शोधून फक्त एकच बाग पहावयाची राहिली, तरी ते विधान करता येणार नाही कारण त्या बागेत जर सोनचाफ्याची फुले असली तर ते विधान खोटे ठरून इतर सर्व बागा धुंडाळल्याचे त्याचे श्रम अगदी फुकट जातील.

पुनर्जन्म नाही असें नकारात्मक विधान करण्याची जबाबदारी मोठी आहे. अर्थात् पुष्कळ बुद्धिमान् व विचारी माणसे ‘पुनर्जन्म नाही’ असे विधान करण्यास तयार नसतात. ते म्हणतात, मरणोत्तर माणसाची स्थिति काय असते, मरणोत्तर माणसाला अस्तित्व असते की नाही, हे आम्हाला माहीत नाही. कदाचित् माणसाला मरणाच्या नतर अस्तित्व असेल किंवा कदाचित् नसेल मनुष्य म्हणजे फक्त देह होय, त्याचे मनही त्याच्या देहापासून—त्याच्या मेंदूपासून—उत्पन्न झालेले असते; देहाव्यतिरिक्त आत्मा म्हणून काही शाश्वत टिकणारा भाग माणसाला नसतो, असे पुष्कळ शास्त्रज्ञांचे मत आहे. कदाचित् तें मत खरें असण्याचा संभव आहे. जर खरोखरी तसे असेल, जर देहाव्यतिरिक्त मनुष्यामध्ये दुसरे काहीच नसेल, जर त्याची मीपणाची जाणीव, त्याच्या साऱ्या मनोवृत्ति, सारे संकल्प व आशा, एकूण एक देहोद्भव असतील, तर शरीर मृत्यूनंतर नाश पावत असल्यामुळें मागे काहीच शिल्लक उरणार नाही, व पुनर्जन्मवाद खोटा आहे असे मानावे लागेल. उलट पक्षी माणसामधील कांही भाग शाश्वत असण्याचीही शक्यता आहे. सर्व कांही देहापासून उत्पन्न झालेलें असेलच असे नाही. समजा जर त्याच्यामधील कांही अंश देहाच्या नाशानंतरही शाबूद रहाण्याजोगा असला, तर पुनर्जन्म शक्य कोटीत येईल. सोन्याच्या तारेत मोत्ये ओंवून जर एकादा हार कोणी केलेला असला—सूत्रे

मणिगणा इव अशी गीतेंत उपमा आलेली आहेच—आणि तो हार आपण विस्तवांत नेऊन टाकला तर मोत्ये जळून जरी त्यांची पूड किंवा राख झाली, तरी सोन्याची तार तशीच शाबूद राहील आणि त्या तारेत नवीन मोत्ये ओवून नवीन हार करणे शक्य होईल. तद्वत् माणसाचा देह जगी भस्मसात् झाला, तरी सूत्ररूपी आत्मा कदाचित कायम रहात असेल व त्या सूत्रात नवीन देहरूपी मोती ओवणे कदाचित् शक्य असेल नाही कोणी म्हणावे? अशा प्रकारची वस्तुस्थिति असल्यास पुनर्जन्मवाद कदाचित् खराही असेल.

## सिद्ध करून दाखवा

ही मडळी पुढे असेही म्हणतील की पुनर्जन्म नाही असे आम्ही म्हणत नाही, आम्ही तसले नास्तिपक्षी विधान करण्याची जबाबदारी स्वत.वर घेत नाही. पुनर्जन्म शक्य कोटींत आहे हे आम्हास कबूल आहे कदाचित् माणसाला पुनर्जन्म असेल, कदाचित् नसेल, तो पुराव्याचा प्रश्न आहे. अस्तिपक्षी विधान करावयाचे असले तर त्यासही प्रमाणाची जरूरी असते. तसा पुरावा जर उपलब्ध असेल तर आम्ही पुनर्जन्म मानू नाही तर मानणार नाही. जगातील सर्व धर्मात पुनर्जन्म सांगितला आहे एवढ्याच गोष्टीवर आमचे समाधान होत नाही. 'बाबा वाक्यम् प्रमाणम्' हे हल्लीच्या मतस्वातंत्र्याच्या काळी आम्ही ऐकणार नाही. पुष्कळ मोठमोठ्या लोकाच्या मते पुनर्जन्मवाद खरा असला तरी प्रमाणाच्या अभावी ती मतें आज कोणी ग्राह्य मानणार नाही. मोठ्या लोकाचीही मते कधी कधी चुकलेली असतात. कोपर्निकसच्या पूर्वी झालेल्या बहुतेक सर्व मोठ्या लोकास वाटे की पृथ्वी स्थिर आहे. पण ते मत चुकल्याचे आता सिद्ध झाले आहे. राहू—केतू या राक्षसाच्या मुळे चंद्रसूर्यास ग्रहण लागतें असें पूर्वी अनेक मोठया लोकास वाटलेलें आहे

हातोड्यानें हिरा फुटत नाही, निर्जीव शेणांत सजीव किडे आपोआप उत्पन्न होतात अशा पुष्कळ बुद्धिमान् माणसांच्या पूर्वी समजुती होत्या व अद्यापीही आहेत. पण या समजुतीचे मिथ्यात्व शास्त्रीय प्रयोगानी सिद्ध झालेले आहे अशा स्थितीत नुसती मोठ्या व्यक्तीची मतें ऐकून आमची खात्री होणार नाही. जर तुम्ही भरपूर पुरावा दिलात तर आम्ही पुनर्जन्मवाद मानू, न दिलात तर मानणार नाहीं.

आज अनेक विचारी माणसांची या विषयाकडे पहाण्याची दृष्टि ही अशी आहे. ती सर्वथा योग्य आहे हे कबूल केले पाहिजे. पुरावा द्या, तुमची प्रमाणे आमच्या समोर मांडा हें म्हणणें वावगें नाही कोणतेही मत ठरविण्यापूर्वी माणसाचें मन साफ असले पाहिजे, कोणतेही आग्रह त्याच्या वृत्तीत असता उपयोगी नाहीत, दुराग्रह सोडून निःपक्षपात बुद्धीने त्याने विचार केला पाहिजे हे उघड आहे. पण अशा तऱ्हेची वृत्ति असली तरी कोणताही सिद्धांत प्रस्थापित करावयाचा असेल तर त्या माणसासमोर पुरावा आणून ठेवला पाहिजे. अर्थात् पुनर्जन्मवादाच्या संबधाने योग्य असा पुरावा व प्रमाणे देता येण्याजोगी आहेत किंवा नाहीत याचा विचार आपणास यापुढें करणे जरूर आहे. तो उपक्रम आपण पुढील प्रकरणात करू या

## प्रकरण ३ रें

# माणसाला पुनर्जन्म असतो काय?

पुनर्जन्म म्हणजे काय याची वाचकाना यथार्थ कल्पना करून दिल्यावर आता आपण पुनर्जन्मवाद खरा की खोटा या प्रश्नाच्या विवेचनास सुरवात करू या पुनर्जन्मवाद खोटा आहे असे दर्शविणारी निर्णायक प्रमाणे सापडणे शक्य नाही हे आपण गेल्या प्रकरणात पाहिले तेव्हा तो खरा आहे असे दर्शविणारी निर्णायक प्रमाणे उपलब्ध आहेत का ? याचा शोध आता आपणास करणे प्राप्त आहे पुनर्जन्मासबधाचा पुरावा विविध प्रकारचा आहे त्यापैकीं प्राचीन काळी प्रचलित असणारी प्रमाणे आपण प्रथम या प्रकरणात विचारात घेऊ या 'प्राचीन काळी प्रचलित असलेली प्रमाणे' असे जे आम्ही म्हणत आहो त्यावरून ती प्रमाणे आज प्रचलित नाहीत व आधुनिकाना मान्य नाहीत असा त्याचा अर्थ नाहीं. पुनर्जन्मवादाच्या आधुनिक पुरस्कर्त्याना ती मान्य आहेत याबद्दल मुळीच सशय नाही पण मूलत ती प्रमाणे प्राचीन ग्रथकाराच्या ग्रथात आढळत असल्यामुळे आम्ही त्याचा तसा निर्देश करीत आहो ही प्रमाणे मुख्यत तर्कावर आधारलेली आहेत तीच आम्हाला या प्रकरणात घ्यावयाची असून अलीकडच्या काळी प्रसृत झालेला उत्क्रातिवाद किवा अलीकडचे शास्त्रीय शोध याशी जो पुरावा सल्लग्न आहे त्याचा परामर्ष नतर पुढच्या दोन तीन प्रकरणात घेण्याचा आमचा सकल्प आहे

हिदुधर्माच्या प्राचीन ग्रथात पुनर्जन्मवादाची विस्तृत चर्चा फारशी सापडत नाही पुनर्जन्माचा सिद्धान्त म्हणजे हिदुधर्माच्या

इमारतीचा एक मोठा आधारस्तंभ असूनही आपल्या धर्मग्रंथात त्याचे विस्तृत विवेचन आलेले नाही याचे आमच्या वाचकाना आश्चर्य वाटण्याचा संभव आहे पण तसे वाटण्याचे कारण नाही. ज्या गोष्टीचा माणसाला संशय असतो तिची तो मुद्दाम शहानिशा करतो, पण जी गोष्ट त्याला स्वाभाविक व सरळ दिसते तिचा काथ्याकूट तो प्राय करीत नाही. हिंदुधर्माला पुनर्जन्मवाद अगदी नैसर्गिक असा वाटलेला आहे अर्थात् तो हिंदुधर्मात सर्वत्र गृहीत धरलेला असून मुद्दाम त्याची ओढून ताणून चर्चा करण्याची गरज हिंदुधर्माला वाटलेली नाही हे आपण लक्षात ठेविले पाहिजे पण याच कारणामुळे पुनर्जन्मवादाची सारी प्रमाणें धर्मग्रंथातून हुडकून काढणे जास्त कठिण झालेले आहे, व ती सागोपाग रीतीने फारशी कोठे एकत्र सांगितलेली नसल्यामुळे आधुनिक लोकात पुनर्जन्मा-विषयी अश्रद्धा बोकाळण्यासही बराचसा वाव सापडला आहे. ती प्रमाणे आपण या प्रकरणात पाहू या.

## ईश्वरावर वेडगळपणाचा आरोप

माणसाला पुन पुन. जन्म येत नाही, असे मानले तर माणूस एकदाच जन्मास येतो व एकदाच मरतो असें कल्पिल्याशिवाय गत्यतर नाही तसे जर आपण क्षणभर कल्पिले तर आपणाला जगातील एकही गोष्ट समजू शकणार नाही जग ही एक अधार-कोठडी आहे, त्या कोठडीत आपणास ईश्वराने डांबून ठेविलेले आहे, त्या कोठडीत कोणास काही दिसत नाही वा समजत नाही, ज्या ईश्वराने जगद्रूपी ही अधार-कोठडी निर्माण केली त्या ईश्व-राच्याही मनात काही योजना नाही, समजस असा नकाशा नाही असे मानणे भाग पडते. जग ही एक सोडत आहे, त्यात कोणास बक्षिस मिळेल व कोणाची तिकिटे फुकट जातील याचा काही नेम नाही असे मानावे लागेल. सोडतीत जरी सर्वत्र अनिश्चित-पणा असला तरी सोडत काढणाऱ्याच्या मनांत स्वत. पैसे मिळ-

विण्याची इच्छा असते पण या जगाच्या सोडतीचा उत्पादक जो ईश्वर त्याला सोडत काढणाऱ्या माणसाइतकीही समजूत नाही असे ठरविणे भाग पडतें एकादा अगदी कमी बुद्धीचा माणूस घेतला तरी मनात काही तरी हेतु धरून, काही तरी भली बुरी योजना आखून तो आपले उद्योग करीत असतो असे आढळून येते पुष्कळ माणसे पोटासाठी उद्योग करीत असतात व अमुक एक उद्योग केल्याने अमुक एक प्रकारे मी माझे पोट भरीन असा त्याचा संकल्प असतो पोट भरणे हे माझे ध्येय, पोट भरण्यास पैसा उपयोगी असतो म्हणून मला तो हवा, अमुक उद्योग केल्याने मला तो पैसा मिळेल व यासाठी मी तो उद्योग करीन अशी त्याने आपल्या मनात योजना आखलेली असते, व तदनुसार तो क्रिया करीत असतो पुनर्जन्म नाही असे मानावयाचे असेल तर एकादी योजना ठरविण्याचीही ईश्वराला अक्कल नाही, सुबुद्ध योजनेविना वेडगळ माणसाप्रमाणे त्याने हे जग रचले आहे असे म्हणणे प्राप्त होते

अगदी स्थूलमानाने पाहिल्यास पृथ्वीवर सुमारे दोन अब्ज (दोनशे कोट) माणसे आहेत असे म्हणता येईल यातली सुमारे एक लाख माणसे रोज मरतात व अजमासे तितकीच अर्भके जन्मास येतात असे मानल्यास ते फारसे चुकणार नाही वाचकहो, कल्पना करा की आपण एका उच्च मनोऱ्यावर उभे आहो व त्या मनोऱ्याच्या पायथ्याशी सुमारे दोन अब्ज माणसाचा थवा परस्परास खेटून उभा आहे मनोऱ्याच्या एका अगाला एक लाबच लाब अशी निरुद वाट आहे व ती एका बाळत-पणाच्या इस्पितळापर्यंत गेलेली असून त्या इस्पितळातून दररोज सुमारे एक लाख स्त्रियाची राग आपली नुकतीच जन्मलेली अर्भके फडक्यात गुडाळून घेऊन त्या वाटेने चालत चालत त्या थव्याला येऊन मिळत आहेत व दुसऱ्या अगाला तसलीच एक निरुद वाट असून त्या वाटेने दररोज एक लाख प्रेताची एकसारखी मालिका थेट मोनापुरापर्यंत लागलेली आहे आणि त्या लाख चितांच्या प्रचड

ज्वाळाचा नभोमडलातल्या कृष्ण मेघावर तांबडा लाल प्रकाश आकाशभर पडला आहे! आणि आश्चर्य हे की या भेसूर दृश्यातल्या कोणत्याही माणसाला आगापिच्छा काही नाही. कोठून तरी एक लाख बालके रोज इस्पितळात येतात, एका बाजूने त्या थव्यात येऊन मिसळतात आणि दुसऱ्या बाजूने त्या थव्यातील एक लाख माणसे सोनापुरात भस्मीभूत होऊन कोठेतरी नाहीशी होतात! जगाचा हा चित्रपट आहे. जशा उल्का पडाव्या तशी या जगात माणसे येतात आणि झंझावातात जसे दिवे विझावे तशी ती लयास जातात. बरे ह्या जगात जी माणसे जन्मतात त्याना काहीतरी ताळतंत्र असावे! पण तेही बिलकुल नाही. एक अर्भक आज सकाळी जन्मास आले आणि सूर्य अस्तास जाण्यापूर्वी त्याचा सर्व कारभार आटपून सोनापुरात दृष्टिआड झाले. या आठदहा तासाच्या अवधीत त्या बालकाने काय मिळविले? तर काही नाही. श्वासोच्छ्वास करून थोडीशी हवा अशुद्ध करण्यापलीकडे त्याने जगात काहीच क्रिया केली नाही. जगात सुग्रास अन्न आहे, मोठाले पराक्रम आहेत, सुन्दर वाङमय आहे, मनोरम देखावे आहेत, बुद्धीला तेज देणारे ज्ञान आहे व हृदयाला आनदविणारे प्रेम आहे, पण यापैकी एकाचाही त्या बालकाला किंचिन्मात्र स्पर्श झालेला नाही. हे मूल एकदाच जन्मास आले आणि लगेच मेले, आठदहा तासाचाच काय तो त्याचा व जगाचा ऋणानुबध जडला. अन पर पुन त्याचा तसा ऋणानुबध कदापि येणार नाही. काय या जीवाचा जगाला उपयोग? आणि काय ह्या विस्तृत सृष्टीचा त्या जीवाला फायदा? आता साठी उलटून मरणाऱ्या माणसाची गोष्ट घ्या. हा माणूस जन्मल्यावर आईबापानी त्याला शाळेत घातला, व अभ्यासाने त्याची ग्रहणशक्ति वाढली. मग उद्योग करून त्याने दोन पैसे मिळविले, लग्न करून ससार थाटला, बायकामुलावर निस्सीम प्रेम केले, त्याच्यासाठी जन्मभर कष्ट केले, आणि जगासाठी आणि कुटुंबासाठी साठ वर्षभर नाना प्रकारच्या

केलेल्या उद्योगातून अनुभव मिळविल्यामुळे या रुपेरी केसांच्या वयोवृद्ध माणसाला सभोवतालची सर्व माणसे मान देऊ लागली हा पुरुष उद्योगी आहे, परोपकारी आहे, प्रेमळ आहे, सद्‌गुणी आहे, ज्ञानी आहे असे म्हणून ती त्याची स्तुति करू लागली, तोच तोही सोनापुरात चालला आणि दोन घटकात त्याचीही चिमुटभर राख झाली साठ वर्षे निढळाच्या घामाने जो अनुभव गाठी बांधला, चार तपे सारखा परिश्रम करून जे ज्ञान व जे सद्‌गुण संपादन केले त्याचा आता कोणाला काही उपयोग आहे का ? बिलकुल नाही कारण या गृहस्थाचा हाच पहिला जन्म व हाच शेवटला जन्म त्या गृहस्थाने आपल्या मुलाबाळांवर आणि बायकोवर निस्सीम प्रेम केले होते ती मुलेबाळे त्याला भेटतील का ? भेट होऊन त्या सर्वांचे प्रेम आणखी वाढेल का ? छे छे ! जर प्रत्येक माणसाला एकच जन्म आहे तर पुन कोण कोणास कोठे भेटणार ? तो गृहस्थ गेला, नष्ट झाला त्याचे शील, त्याचे ज्ञान, त्याने कमाविलेल्या सर्व शक्ति साऱ्या त्याच्या बरोबर मातीस मिळाल्या ? [१]

अशा तऱ्हेने जगाची उपपत्ति लावली तर ती माणसाला पटणे शक्य नाही पण पुनर्जन्म मानला तर जगात सुबुद्धपणा दिसतो लहानपणीच मरणारे बालक पुन अनेक वार जन्मास

१ या गोष्टी त्याच्या संततीत उतरून जगाला उपयोगी पडतील असे आमच्या वाचकास वाटण्याचा संभव आहे पण नैसर्गिक गुण जरी आईबापापासून संततीत उतरत असले तरी मुद्दाम संपादन केलेले गुण संततीत उतरत नाहीत असे मानण्याकडेसच आजच्या प्राणिशास्त्रज्ञाचा एकंदरीत कल आहे स्वसंपादित गुण आपल्या मुलाबाळामध्ये उतरल्याचा फारसा पुरावा अद्याप शास्त्रज्ञास सापडलेला नाही (Modern biologist are almost unanimous in their opposition to the so-called transmission of acquired characters in the Lamarckian or neo-Lamarckian sense of the term हॅमिल्टन–बॉइड–मॉस्मन कृत Human Embriology पृ ३) आईबापाच्या देहात विशिष्ट

(शेष पुढील पानावर चालू)

येणार आहे, या जन्मी काही कारणामुळे त्यास जगांत काही शिकावयास सापडले नसले तरी पुढच्या अनेक जन्मी ते त्याला करता येणार आहे वृद्ध माणसाने कमाविलेल्या शक्ति फुकट जात नाहीत तो माणूस पुन पुन्हा अनेकदा जन्मास येणार आहे आणि त्याच्या शक्तीचा जास्त जास्त उपयोग त्याला व त्याच्या सभोवतालच्या लोकाना होणार आहे ज्यानी त्याच्यावर प्रेम केले आणि त्याने ज्याच्यावर प्रेम केले त्याच्या पुन पुन्हा गाठी पडावयाच्या आहेत आणि त्या सर्वाचा गुणविकास व्हावयाचा आहे पुनर्जन्मवाद हे सारे शिकवितो आणि जगामध्ये सुबुद्ध योजना आहे हे दाखवून देतो जर पुनर्जन्मवाद मान्य केला तर जगातील अनेक कोडी सुटतात आणि जगाच्या रचनेत सुसगतपणा दिसू लागतो जर तो मान्य न केला तर ईश्वर हा मूर्ख आहे, सामान्य माणसाच्या उद्योगात दिसणारी योजकताही त्याच्या अगी नाही, जगाच्या बागेत तो सुदर सुदर झाडे लावतो, काही झाडे लावल्या दिवशीच लहरीखातर उपटून टाकतो आणि कित्येक झाडाची वर्षानुवर्ष जोपासना करून पुढे त्याना सुदर व सुवासिक फुले आणि मधुर व रुचकर फळे येण्याचा समय आला की ती सारी पायाखाली चिरडून टाकतो असे म्हणणे प्राप्त होईल

(टीप मागील पानावरून)

पेशी असतात त्याचा सयाग होऊन मूल जन्मते ह्या पेशी व देहातल्या इतर पेशी ह्या विभक्तपणे राहिलेल्या असतात आईबाप जन्मल्यापासून ते मरेपर्यंत त्याच्या देहात असणाऱ्या इतर पेशी व सतति निर्माण करू शकणाऱ्या ह्या पेशी, वेगळ्या कप्प्यात जणू ठेवलेल्या असतात, आणि देहातल्या इतर पेशीचा सबध या पेशीशी बिलकूल येत नाही आईबापानी नवे गुण सपादन केले तर त्याचा परिणाम देहातल्या इतर पेशीवर होतो, पण सतति निर्माण करू शकणाऱ्या या वेगळ्या काढलेल्या पेशीवर होत नाही सततीत येणारे गुणदोष या वेगळ्या ठेवलेल्या पेशीपासून उद्‌भवतात आणि म्हणूनच माणसाने नवीन सपादन केलेले गुण सततीत उतरत नाहीत असे जीवशास्त्रज्ञाचे म्हणणे आहे या मुद्द्याची अधिक चर्चा प्रकरण ८ मध्ये केली आहे.

## ईश्वर कीं नैसर्गिक निवड ?

यावर काही माणसे असे म्हणतील की आम्ही ईश्वरच मानीत नाही, मग तो शहाणा आहे की वेडा आहे हा प्रश्न उत्पन्न होत नाही प्रथम ईश्वर माना व तो ईश्वर मूर्ख ठरू नये म्हणून मग पुनर्जन्म माना हे कोणी सांगितले आहे ? याला उत्तर आहे ईश्वर न मानला तरी सृष्टि मानणे तरी सर्वांना भाग आहे या सृष्टीत सर्वत्र सुसबद्धपणा दिसतो माणसाच्या डोळ्याची रचना पाहिली, कमी अधिक प्रकाशाबरोबर आपोआप लहानमोठी होणारी कनीनिका पाहिली, तिच्या मागचे बहिर्गोल भिंग पाहिले, त्या भिंगास चापट फुगीर करणारे स्नायु पाहिले म्हणजे डोळ्याच्या रचनेत योजकता दिसून येते सुंदर फुले भ्रमराचे मन आकर्षित करतात आणि त्याना मध देण्याच्या मिषाने आपले केसर त्याच्या बरोबर दुसऱ्या फुलाकडे पाठवून फळे उत्पन्न करवितात यातही योजकता दिसते प्रवाही पदार्थ गोठताना जरी सामान्यतः जड होतात तरी पाण्याचे बर्फ होताना ते हलके होते आणि म्हणूनच नदी, तलाव, समुद्र ही गोठली तरी वर बर्फाचा थर राहून खाली पाणी वहात असते आणि त्यामुळेच सारी जलचराची सृष्टि जीवन राहू शकते, हीही योजकताच होय ही योजकता पाहून सृष्टीच्या मागे कोणी तरी ज्ञानी असा ईश्वर असला पाहिजे असे पुष्कळ तत्त्व-वेत्त्याना वाटत आलेले आहे पण अलीकडच्या काळी अनेक प्राणि-शास्त्रवेत्त्यानी आपले असे मत दिलेले आहे की ह्या साऱ्या गोष्टी नैसर्गिक निवडीच्या आंधळया तत्त्वानुसार होऊ शकतात, त्यासाठी डोळस ईश्वर मानण्याची जरूरी नाही आम्हास हे मत कबूल नाही कोणतीही आंधळी गोष्ट सृष्टीत सुसंगतपणा व योजकता हे गुण निर्माण करील असे म्हणणे म्हणजे वदतो व्याघात होय जर आंधळी तत्त्वे सुसंगत सृष्टीची उभारणी करण्यास समर्थ असतील, तर संगमरवरी दगडाचे आंधळे कण एकमेकास चिकटून त्यापासून आग्र्याचा ताजमहाल आपोआप बांधला जाईल, वर्ण मालेची आंधळी अक्षरे एकापुढे एक रांगेने लागून त्यापासून सहज

सहजी भगवद्गीता निर्माण होईल, त्यासाठी शिल्पकार नकोत, इंजिनीयर नकोत, व्यास नकोत व श्रीकृष्णही नकोत असे म्हणण्याची पाळी येईल पण हा वाद स्वतंत्र आहे हा वाद बाजूस ठेविला तरी सुयंत्रपणा, सुसबद्धपणा, योजकपणा हे गुण सृष्टीत दिसतात हे सर्वांसच मान्य आहे मग आमच्यासारख्या काही लोकांच्या मतानुसार ते गुण ईश्वराच्या कर्तृत्वामुळे उत्पन्न झालेले असोत, अथवा डार्विनादि शास्त्रज्ञांच्या म्हणण्याप्रमाणे ते नैसर्गिक निवडीच्या निर्जीव तत्त्वामुळे निर्माण झालेले असोत पुनर्जन्म मानला नाही तर सृष्टीत योजकपणा नाही असे म्हणावे लागते ईश्वर मानणारा माणूस म्हणेल की सृष्टीत योजकपणा नाही म्हणणे म्हणजे ईश्वराला अक्कल नाही असे म्हणणे होय व तसे म्हणणे रास्त नाही नैसर्गिक निवडीच्या तत्त्वावर श्रद्धा ठेवणारा माणूस म्हणेल की सृष्टीत योजकपणा नाही म्हणणे म्हणजे नैसर्गिक निवडीचे तत्त्व कार्यक्षम नाही असे कबूल करण्यासारखे होय व ते रास्त नाही एवंच जर पुनर्जन्माच्या सिद्धान्तामुळे सृष्टीत योजकपणा येत असेल– व तो तसा येतो हे आपण वर पाहिले आहे– तर तो सिद्धान्त खरा आहे असे मानणे भाग आहे, मग ईश्वराच्या ज्ञातृत्वावर घाला पडतो म्हणून तो सिद्धान्त भाविक लोक खरा मानोत अथवा नैसर्गिक निवडीच्या शास्त्रीय तत्त्वास आधार देण्यासाठी खरा मानोत [1]

## कृतहान व अकृत अभ्यागम

आता आपण दुसऱ्या एका दिशेने विचार करू या जर माणसाला पुन पुन्हा जन्म येत नाही, जर त्याला एकच जन्म

१ ईश्वर आहे की नाही, नैसर्गिक निवडीचे तत्त्व सर्वस्वी आंधळे आहे की काय, ते सृष्टीत कोठे व कितपत लागू होते, ईश्वराच्या योजकतेचे गमक त्या तत्त्वात सापडेल की नाही वगैरे वाद या ठिकाणी उत्पन्न होतात ते पुनर्जन्माच्या सिद्धांताला अप्रस्तुत असल्यामुळे आम्ही येथे त्यात शिरत नाही या विषयावर आम्ही 'ईश्वर आहे की नाही ?' या नावाचे पुस्तक लिहून प्रसिद्ध केले आहे त्यात हे सर्व मुद्दे चर्चिलेले आहेत.

आहे तर एक माणूस गरीब का व दुसरा श्रीमंत का ? एक माणूस सशक्त व निरोगी आणि दुसरा रोगी आणि निर्बल का ? एक माणूस शंकराचार्यासारखा ज्ञानी व दुसरा धोंडे मारणारा वेडा का ? एक तुकारामासारखा विरक्त तर दुसरा धाकटया बाजीरावासारखा विलासी का ? एक माणूस थोरल्या बाजीरावासारखा पराक्रमी का आणि दुसरा कामवेळच्या मुलामारखा बेवकूफ का ? जर एकच जन्म मानला तर जगात सर्वत्र अन्याय भरला आहे व ईश्वर म्हणजे एक सुलतान असून त्याचे राज्य ही शुद्ध मोगलाई होय असे मानणे भाग पडेल ईश्वराने आपल्या लहरीखातर एकाला अक्कलवान् केले व दुसऱ्याला मूर्ख केले, एकाला साधु केले व दुसऱ्याला दुर्गुणाचा पुतळा केले, एकाला गजान्त लक्ष्मी दिली व दुसऱ्याला भुके बगाल बनविले, एकाला पराक्रमी निर्मिले व दुसऱ्याला रडतराऊत केले, असे कबूल करावे लागेल आणि सद्गुण, सच्छील, पराक्रम, बुद्धिमत्ता याना वस्तुत काहीच किमत नाही असे ठरवून टाकणे भाग पडेल ओली माती घेऊन कुंभाराने एक धड मडके केले व दुसरे फुटके केले तर आपण त्या धड मडक्याची स्तुति करीत नाही की त्या फुटक्या मडक्याची निंदा करीत नाही जशी कुंभाराने मडकी केली तशी ती झाली असे म्हणून योग्यायोग्यतेचा प्रश्न आपण बाजूस सारतो जर पुनर्जन्म नसेल तर अमुक एक गोष्ट चांगली, इष्ट, स्तुत्य व तमुक एक गोष्ट त्याज्य व निंद्य असे म्हणण्याचा आपणाला बिलकुल अधिकार राहणार नाही रामदास स्वामीची नैष्ठिक ब्रह्मचर्याबद्दल स्तुति करण्याचे कारण नाही, आणि सहा बायका करून त्यातल्या दोहीशी काडीमोड करणाऱ्या व दोहीस फाशी देणाऱ्या आठव्या हेन्रीला दोष देण्याचे कारण नाही रामदास काय किंवा हेन्री काय जसे देवाने त्याला केले तसे ते झाले स्वार्थाची आहुति देणारा हुतात्मा आणि अनेकाचा जीव घेणारा खुनी या दोहोंची तुलना करून त्याना बरे वाईट म्हणण्याचे आपणाला काम नाही सोडतीत एकाला दहा लाख रुपयाचे बक्षिस मिळाले व दुसऱ्याला काहीच मिळाले नाही

म्हणून आपण एकाला सद्गुणी, नीतिमान्, थोर अशी विशेषणे लावीत नाही, व दुसऱ्याला नीच, क्षुद्र, दुर्गुणी असे म्हणत नाही मोडतीत बक्षिस मिळणे वा न मिळणे हा नशिबाचा प्रश्न आहे असे म्हणून आपण त्या लोकाना चागल्या वाइटाची कसोटी लावण्याचे सोडून देतो तद्वत् पुनर्जन्म मानला नाही तर जसे माणसाला देवाने घडविले तसा तो आला जसे केवळ करणे आपणाला भाग होऊन चागले–वाईट, नीति–अनीति, स्तुति–निंदा इष्ट–अनिष्ट या साऱ्या कल्पनाना आपणास तिलाजलि द्यावी लागेल, आणि जग हे साऱ्या अन्यायाचे माहेरघर आहे हा सिद्धात स्वीकारावा लागेल

उलटपक्षी पुनर्जन्म मानल्यास ह्या अडचणी नाहीशा होतात माणूस वाटेल ती गोष्ट करण्यास स्वतत्र आहे, पण त्याने ती एकदा करून टाकली म्हणजे त्या गोष्टीचे परिणाम त्याला भोगणे अवश्य असते विस्तवात हात घालावा की घालू नये या प्रश्नाचे वाटेल ते उत्तर देण्यास माणसास मुभा आहे पण अस्तिपक्षी उत्तर देऊन त्याने विस्तवात हात घातला तर हात भाजणे, हाताला फोड येणे हे परिणाम त्याला टाळता येणार नाहीत इद्रिये ताब्यात ठेवावी की मोकाट सोडावी यापैकी वाटेल ती गोष्ट करण्याला त्याला मोकळीक आहे जर तो ती स्वाधीन ठेवील तर तो मनाने निर्मल, प्रकृतीने सुदृढ व वर्तनाने चागला होईल जर तो इद्रिये मोकाट सोडून खादाड, दारूबाज, विषयासक्त झाला तर त्याची प्रकृति बिघडेल, दुर्गुण स्वभावात घर करतील आणि त्याचे वर्तन घाणेरडे होईल आपण आपल्या इष्टमित्राशी प्रेमाने, नेकीने व निर्लोभीपणाने वागावे की त्यास फसवून बुचाडावे व त्याशी दुष्टावा करून त्याना निर्दयपणाने वागवावे यापैकी हवे ते करण्यास त्यास वाट मोकळी आहे एका वाटेने तो गेल्यास त्याच्या स्वभावात लुच्चेगिरी, दुष्टपणा यासारखे दुर्गुण बद्धमूळ होतील, त्याचे मित्र त्याला परिणामी सोडून जातील व शक्य तर त्याचे उलट नुकसानही करतील दुसऱ्या वाटेने तो गेल्यास तो आपल्या इष्टमित्रास प्रेमरज्जूने स्वतःशी बाधून ठेवील, ते

त्याचे सदासर्वदा हित पहातील आणि त्याचा स्वभाव दिलदार होईल प्रत्येक गोष्टीला परिणाम असतात त्यापैकी काही गोष्टींचे परिणाम सर्वांना आज माहीत झाले आहेत व काही गोष्टींचे अजून नीट समजलेले नाहीत काही परिणाम तात्काळ होतात काहीस वेळ लागतो विस्तवात हात घातल्यास तो भाजतो हे सर्वास माहीत आहे पुष्कळ दिवस अतिरिक्त दारू प्याल्यास प्रकृति बिघडते हाही परिणाम सर्वास ठाऊक आहे पैकी विस्तवात हात घातल्यावर एका घटकेच्या आत हातास फोड येतो, पण अतिरिक्त दारू पिण्याचे व्यसन असल्यास प्रकृति बिघडण्यास अनेक वर्षे लागतात चागले ग्रथ मननपूर्वक वाचल्यास माणसाची बुद्धि कुशाग्र होते, पण हा परिणाम होण्याला पुष्कळ दिवस लागतात इद्रियदमनाचा अभ्यास केल्यास शील सुधारते, पण त्यालाही पुष्कळ वर्षे लागतात उलटपक्षी न पचतील इतकी भजी खाल्ल्यास पोट दुखते, पण हा परिणाम होण्यास चार सहा तासापेक्षा जास्त वेळ लागत नाही या गोष्टी सर्व सुबुद्ध माणसाना कळून असतात पण एका माणसाने दुसऱ्यास वाईट रीतीने वागविल्यास, किवा त्यास फसविल्यास त्याचा सृष्टिक्रमानुसार त्या माणसावर बाहेरून काय परिणाम होईल हे पुष्कळास माहीत नसते पुनर्जन्माचा सिद्धान्त व त्याशी सलग्न असलेला कर्माचा सिद्धान्त हे आपणाला शिकवितात की त्या माणसाला दुसरा कोणीतरी वाईट रीतीने वागवील किवा फसवील, हा त्या क्रियाचा परिणाम होय व तो परिणाम परिस्थितीनुसार कधी लवकर होईल तर कधी उशीरा होईल

एवच पुनर्जन्मवाद्याचे म्हणणे असे की माणूस हा सर्व गोष्टीचा कर्ता आहे, तो जे पेरील तेच उगवेल, माणसाने स्वत ला जसे बनविले असेल तसा तो होईल, त्यात ईश्वराच्या लहरीचा प्रश्न नाही '**नादत्ते कस्यचित्पापम् न चैव सुकृतं विभु ।**' (गीता) माणूस आपल्या वर्तनाने स्वत चा स्वभाव घडवितो व स्वत ची परिस्थितीही निर्माण करितो त्याच्या वर्तनाचे काही परिणाम लवकर होतात व ते त्याला त्याच जन्मी भोगावे लागतात काही

परिणाम पक्व होण्यास जास्त दिवस लागतात आणि ते दुसऱ्या जन्मी भोगणे प्राप्त होते. जसे कर्म पेरावे तसेच त्याचे पीक येते, त्यातले काही या जन्मी पदरात पडेल व काही पुढच्या जन्मी पदरात पडेल कोणतेही कर्म फुकट जात नाही पुष्कळ माणसे सत्कर्म करतात, पण केलेल्या कर्माचे परिणाम त्याना या जन्मी भोगण्यास मिळत नाहीत व ते सत्कर्म फुकट गेले असे वरवर पहाणाऱ्यास वाटते पुष्कळ लोक दुष्कर्मे करितात व त्या दुष्कर्माचे परिणाम न भोगता तो माणूस मरून जातो, आणि अविचारी लोकास वाटते की दुष्कर्माचे प्रायश्चित्त न भोगता हा माणूस त्यातून सुटून गेला आहे पण हा भ्रम आहे हे सर्व परिणाम त्याला भावी नाना जन्मात केव्हातरी अवश्य भोगावे लागतात व त्यासाठीच नाना जन्म अवश्य आहेत रामदासस्वामी जन्मत च निग्रही असले तर ईश्वराची मर्जी खूप होऊन त्याने रामदासाना निग्रहाचा गुण बहाल केला होता असा त्याचा अर्थ नाही राम-दासानी पूर्वी त्या दिशेने नेटाचा प्रयत्न केला होता आणि हा निग्रह त्यानी निढळाच्या घामाने मिळविलेला होता म्हणूनच आपण रामदासाना मान दिला पाहिजे दुसऱ्या बाजीरावाने पूर्वी इद्रियाचे घोडे मोकळे सोडून त्याचे सारे लाड पुरविले होते आणि म्हणूनच या जन्मी त्याची वृत्ति जात्याच विलासप्रिय झालेली होती ती वृत्ति दुष्कर्मोद्भव असल्यामुळे तिला नीतीविरुद्ध व त्याज्य असे म्हणण्याचा आपणाला अधिकार आहे जन्मत च एक माणूस श्रीमत असावा दुसरा दरिद्री असावा, एक हाडापेराने चागला व दुसरा लुलापागळा असावा, एकाला सुदर परिस्थिति मिळावी व दुसऱ्यावर सकटे कोसळावी, एक तैल बुद्धीचा असावा व दुसरा दगड असावा, या विषमतेचे कारण ईश्वराची लहर नव्हे त्या विषमतेची सारी जबाबदारी त्या त्या माणसावर आहे. जी बीजे त्यानी स्वत पूर्वी पेरली त्याची फळे ते आज चाखीत आहेत [1]

१ सृष्टीत माणसाला न्याय मिळणे अवश्य आहे असे ज्याला वाटत

(टीप पुढील पानावर चालू)

## एक आक्षेप

यावर कोणी असे म्हणण्याचा सभव आहे को, पुनर्जन्म मानल्याने माणसामाणसामधील उच्चनीच-भाव व त्याच्या परिस्थितीची अनुकूलता-प्रतिकूलता याचे लोण तुम्ही मागल्या जन्मी नेलेत इतकेच काय ते, पण त्या मागल्या जन्मी तरी माणसामाणसात व त्याच्या परिस्थितीत श्रेष्ठकनिष्ठपणा कोठून आला ? त्याचा उलगडा करण्यासाठी आणखी एक जन्म जरी आपण मागे गेलो आणि असे मागेमागे हवे तितके चाललो तरी त्याने काय होणार ? पहिला जो जन्म झाला त्यात उच्चनीचभाव होता असे तुम्हाला कबूल करावे लागेल मग त्या जन्मात एक श्रीमत व दुसरा गरीब हा भेद ईश्वराने का केला ? त्या पहिल्या जन्मी रामदासानी निग्रहाचा मार्ग धरावा व दुसऱ्या बाजीरावाने विलासाचा मार्ग धरावा हा फरक कोठून आला ? जोवर हा फरक आहे तोवर ईश्वराच्या सृष्टीत अन्याय आहे, मग तो फरक मूळचा या जन्मातला असो, त्याच्या मागच्या जन्मातला असो किंवा अगदी पहिल्या जन्मातला असो

हे म्हणणे अज्ञानमूलक आहे खरोखरी अगदी पहिला जन्म असा कधीच सापडणार नाही, कारण मनुष्यकोटीत येण्याच्या अगोदर जीव प्राणिकोटीत असतो तथापि क्षणभर वादासाठी आपण धरून चालू की मनुष्यकोटीत दोन जीवाचे जे अगदी पहिले जन्म झाले असतील त्या दोहोत ते अगदी सारखे होते पण त्यावरून आजच्या त्या दोघाच्या जन्मात उच्चनीचभाव येणार

(टीप मागील पानावरून)

असेल त्यालाच वरील म्हणणे पटेल हे उघड आहे सृष्टीने माणसाला न्याय दिला पाहिजे असे कोणी सागितले आहे ? असे जे लोक म्हणतील त्याना वरील प्रमाण निर्णायक वाटणार नाही त्याच्यासाठी वेगळ्या रीतीने विचार करणे अवश्य आहे तो विचार या पुस्तकाच्या पुढील प्रकरणात केलेला आहे

नाही असे अनुमान काढता येणार नाही समजा आपण एक पचवीस वर्षाचा तरुण घेतला आणि दुसरा पचावन्न वर्षाचा वयस्क माणूस घेतला, तर पचावन्न वर्षाच्या माणसाने जास्त पावसाळे पाहिलेले असल्यामुळे आणि त्याचा अनुभव-सचय त्या मानाने अधिक असल्यामुळे अनुभवाच्या बाबतीत दोहोमध्ये उच्चनीचभाव येईल हे दोघे आपापल्या पहिल्या वर्षी अगदी सारखे होते, आपापल्या दुसऱ्या वर्षीही अगदी सारखे होते तिसऱ्या चौथ्या पाचव्या वर्षीही सारखे होते असे जरी शेवटपर्यंत मानीत चालले तरी आज जर एकाचे वर्ष पचवीस आहे व दुसऱ्याचे पचावन्न आहे तर आज त्या दोघामध्ये अतर दिसणारच फार तर आपणाला असे म्हणता येईल की आजचा आमचा पचवीस वर्षाचा तरुण, तो वयस्क माणूस पचवीस वर्षाचा असताना जसा होता तसा मध्या आहे पण आपले प्रस्तुतचे बोलणे अगदी निराळे आहे आमचा तरुण माणूस १९२७ साली जन्मला व वयस्क माणूस १८९७ साली जन्मला जरी दोघे आपापल्या जन्माच्या वेळी अगदी सारखे असले आणि जरी त्याची वाढ ततोतत एकसारख्या क्रमाने झाली असली तरी जोवर दोघाचा जन्म एकाच दिवशी झालेला नाही तोवर एक वडील व दुसरा लहान असे रहाणारच व अनुभव-सचयामध्ये श्रेष्ठकनिष्ठपणा त्यामध्ये येणारच ईश्वराने बारा वाजता एकदम घटा वाजविली व नेमके त्या क्षणी पृथ्वीवरच्या सर्व माणसाचे पहिले जन्म पटापट झाले अशी जोवर वस्तुस्थिति नाही तोवर सृष्टीत विषमता येईल पण अन्याय येणार नाही, हे स्पष्ट आहे

## भिन्नपणा व अन्याय

दुसरे असे ध्यानात आणले पाहिजे की भिन्नता ही नेहेमीच अन्यायमूलक असते असे नाही एका शिक्षकाने दोन विद्यार्थ्याना वर्षभर शिकवून शेवटी सारखेच ज्ञान दिलेले आढळेल पण एकाला पहिल्या महिन्यात त्याने गणित विषय जास्त नेटाने शिकविला असला, व दुसऱ्याला भाषाविषय जास्त शिकविला

असला, एकाला शिकविताना विषयाचा क्रम एक प्रकारचा ठेवला असला व दुसऱ्याला शिकविताना वेगळ्या प्रकारचा ठेवला असला, तर जोवर शिकावयाचे सारे विषय वर्षाच्या अती दोघाचे नीट सपत आहेत तोवर त्या शिक्षकाला आपण पक्षपाताचा दोप देऊ शकणार नाही पुनर्जन्माचा फेरा सपला म्हणजे सर्व जीव सर्वाग-परिपूर्ण होतात पण ही सर्वाग-परिपूर्णता प्रत्येकामध्ये एकाच क्रमाने येणे अवश्य आहे असे बिलकुल नाही एका माणसामध्ये प्रारभी एका अगाच्या विकासावर कदाचित् जास्त जोर दण्यात येईल, तुमऱ्या माणसाच्या बाबतीत दुसऱ्या बाजूवर जास्त जोर देण्यात येईल त्यावरून त्यात पक्षपात आहे किवा अन्याय आहे असे म्हणणे रास्त नाही रामदामाना ब्रह्मचर्य का आवडले आणि आठव्या हेन्रीला बहुपत्नीकत्वाचा का मोह पडला असा प्रश्न विचारून आपण ईश्वरावर अन्यायीपणाचा जो आरोप करीत असतो तोही युक्त नाही या दोघाच्या बाबतीत अगोदर क्रमवैचित्र्याचा भाग असणे सभवनीय आहे, इतकेच नव्हे तर रामदास हे जीवदृष्टचा वडील आणि हेन्री हा जीवदृष्टचा पोरवयी आहे हे विसरता कामा नये जग ही शाळा आहे त्यात जन्मरूपी अनेक वर्ग आहेत या शाळेत प्रारभी मुले अज्ञ असतात आणि सहजच चुका करतात, पुढे त्या चुकाचे परिणाम भोगून ती शहाणी होतात आणि असे अनेक जन्म घेत घेत व शहाणपणाची पुजी वाढवीत वाढवीत सरशेवटी सर्व बाजूनी परिपूर्ण होतात रामदासाचा लोकसग्रह, त्याची विरक्ति, त्याचे ब्रह्मचर्य या गोष्टीची वाढ चुटकीसरशी झालेली नाही ब्रह्मचर्य अगी बाणण्याच्या अगोदर केव्हातरी व कोठेतरी विषय-वासनेची ओढ त्यानी अनुभविली असली पाहिजे, तिच्या पायी चुकाही केल्या असल्या पाहिजेत आणि त्या चुकाचे परिणाम हितकर होत नाहीत याची प्रतीति घेऊन क्रमश ते रामदास झाले असले पाहिजेत हे पुनर्जन्मवाद शिकवितो अर्थात् ही क्रमवैचित्र्याची किवा लहान-वडीलपणाची बाब असली तरी न्याय-अन्यायाचा

प्रश्न त्यातून उत्पन्न होत नाही हे आमच्या वाचकानी ध्यानात बाळगणे अवश्य आहे [1]

१ गोनम ऋषीची न्यायसूत्रे व त्या वरील वात्स्यायनाचे भाष्य यामध्ये पुनर्जन्माच्या प्रश्नासबधाने काही प्रमाणे दाखल करण्यात आली आहेत आनदाश्रममालेतील ९१ व्या पुस्तकात वात्स्यायनकृत भाष्यासहित ही सूत्रे आलेली असून त्या पुस्तकाचे नाव **'श्री गौतममुनिप्रणीत न्याय–सूत्राणि'** असे आहे प्रमेये किंवा समजून घेण्याच्या गोष्टी कोणत्या आहेत ते सागताना गौतमानी त्यात 'आत्मा' व 'प्रेत्यभाव' याचा समावेश केला आहे (पहा अध्याय १ आन्हिक १ सूत्र ९ पृ २६) प्रेत्यभाव याचा अर्थ पुनर्जन्म असा आहे (पुनरुत्पत्ति प्रेत्यभाव । अध्याय १ आन्हिक १ सूत्र १९ पृ ३५) या पुस्तकात पुढे आत्मा व प्रेत्यभाव याची परीक्षा केली आहे (पृ १८९ ते २२० व पृ २८६-२८८ अध्याय ४ आन्हिक १ सूत्रे १०-१३) इतरत्र मधून मधून या पुस्तकात पुनर्जन्माच्या सिद्धान्ताचे उल्लेख आले आहेत त्या सर्व उल्लेखाचा एकत्र विचार करता गौतम–वात्स्यायनाची पुनर्जन्माविषयीची प्रमाणे पुढे दिल्याप्रमाणे असल्याचे दिसून येते –

(१) फक्त देह मानला, आत्मा मानला नाही, तर मरणानतर देह जाळून टाकण्याची चाल असल्यामुळे माणसाने जिवतपणी केलेल्या पापाचे परिणाम भोगण्यास कोणीच जाग्यावर उरणार नाही केलेल्या गोष्टीचा परिणाम न होणे ही गोष्ट युक्तीस पटत नाही अर्थात् आत्मा मानणे अवश्य आहे (पृ १९३) आत्मा नित्य आहे असे मानले पाहिजे जर आत्मा नित्य असेल तर एक शरीर मेल्यावर तो दुसरे घेतो असे म्हणणे प्राप्त आहे (पृ २८६ आत्मनित्यत्वे प्रेत्यभावसिद्धि ।)

आम्ही हे प्रमाण प्रस्तुत पुस्तकात नमूद केलेले नाही कारण आत्मा नित्य आहे ही गोष्ट प्रथम सिद्ध करणे सोपे नाही, व ती सिद्ध झाल्याशिवाय पुनर्जन्म सिद्ध होत नाही

(२) लहान अर्भकाना कारणाशिवाय हर्ष, भय, वगैरे भावना वाटत असतात पूर्वजन्मी त्या जीवाने हर्षभयादि विकार अनुभवले होते व त्याची अस्पष्ट स्मृति म्हणून लहान अर्भकाना ते विकार जाणवतात असे मानल्या-

(टीप पुढील पानावर चालू)

(टीप मागील पानावरून)

शिवाय या गोष्टीचा उलगडा होत नाही (पृ २०१–२०२) मूल जन्मल्यावर लगेच आईच्या अगावर न शिकविता पिते पूर्वजन्मी क्षुधा व अशन याचा अनुभव असल्यामुळे त्या स्मृतीने हे होऊ शकते असे मानणे अवश्य आहे (पृ. २०३ प्रेत्याहाराभ्यास कृतात्स्तन्याभिलाषात्।) माणसाच्या आवडीनिवडी ही पूर्वजन्मीच्या अनुभवाच्या स्मृतीने उत्पन्न होतात

हे प्रमाणही आम्ही प्रस्तुत लेखात वाचकासमोर ठेवलेले नाही कारण आधुनिक काळची मडळी त्यावर आक्षेप घेऊ शकतील अर्भकाच्या हर्ष-भयादि भावना कारणाशिवाय होतात असे जे आपणास वाटते ते चूक आहे देहस्वास्थ्यामुळे हर्ष वाटू शकेल, अशक्तपणा व देहदु ख वगैरे कारणामुळे भय वाटू शकेल, एका माणसाच्या विचाराचा दुसऱ्यावर न बोलता परिणाम होतो, तसे होऊन हर्षभयादि विकार अर्भकाच्या मनात उत्पन्न होत असतील, हे विकार तसेच माणसाच्या आवडीनावडी, अर्भकाची आईच्या अगावर दूध पिण्याची प्रवृत्ति, या गोष्टी आईबापापासून सततीत उतरू शकतील, आईबापाचे रोग व त्याचे देहविशेष त्याच्या सततीत जर उतरतात तर तसेच या ठिकाणी होत असेल, अशा प्रकारचे भलेबुरे आक्षेप वरील प्रमाणावर घेता येणे शक्य आहे

(३) पुनर्जन्म मानला नाही तर "कृतहान व अकृतअभ्यागम" हे दोष उत्पन्न होतील व माणसाने केलेल्या कर्माची फळे त्याला मिळत नाहीत, व न केलेल्या कर्माची फळे मिळतात असे मानणे भाग होईल हे प्रमाण तर्कदृष्टचा व नीतिदृष्टचा फार महत्त्वाचे आहे वरील प्रकरणातील बहुतेक सर्व चर्चा जरी नवीन शब्दात माडलेली असली तरी ती या प्रमाणाच्या कक्षेत पडणारी आहे हे चाणाक्ष वाचक ओळखतीलच

---

प्रकरण ४ थे

# अर्वाचीनांचीं प्रमाणें

प्राचीन वाङमयामध्ये जरी उत्क्रान्तिवादाची कल्पना आपणास काही ठिकाणी आढळत असली तरी शास्त्रीय पुरावा देऊन उत्क्रान्तिवाद सिद्ध करणे, उत्क्रान्तिवादाची उपपत्ति सर्व क्षेत्रास लावून दाखविणे, व हरएक गोष्टींचे विवेचन करताना माणसाच्या मनास उत्क्रान्तिवादाची बैठक देणे या गोष्टीचे श्रेय आधुनिक कालातील विद्वानानाच दिले पाहिजे लॅमार्क, डार्विन, वॅलेस, हेकेल, हक्स्ले वगैरे नामांकित प्राणिशास्त्रज्ञांनी उत्क्रान्तिवाद व त्याविषयीच्या प्रक्रिया, याचा प्राणिशास्त्रातला भरभक्कम पुरावा शोधून काढला व स्पेन्सरनामक तत्त्ववेत्त्याने उत्क्रान्तीची कल्पना निरनिराळ्या क्षेत्रास प्रथम लावून दाखविली हे सर्वास माहीत आहेच या गोष्टी एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात घडल्या त्यानतर उत्क्रान्तिवादाचा प्रसार सर्व जगात फार झपाट्याने झाला आहे आता असा कोणताही विषय उरलेला नाही की ज्याचे विवेचन उत्क्रान्तिवादाच्या दृष्टीने करण्याची सवय सुशिक्षित माणसाला लागलेली नाही उत्क्रान्तिवादाच्या तपशिलासबधाने शास्त्रज्ञामध्ये जरी पुष्कळ मतभेद असले तरी उत्क्रान्तीची मूलग्राही कल्पना आज सर्व जगाला मान्य झालेली आहे प्राणि, मनुष्य, वनस्पति यानाच आज उत्क्रान्तिवाद लागू करण्यात येतो असे नाही, तर माणसाचे मन, समाजाची रचना, सूर्यमालेतील गोल, रसायनशास्त्रातील मूलतत्त्वे, भाषेतील शब्द व धर्माचे सिद्धान्त अशा अनेक परस्परभिन्न क्षेत्रासही तो तत्त्व-

दृष्टया लागू होत असल्यामुळे अलीकडच्या काळी उत्क्रान्तिवादाची बैठक विसरून सुबुद्ध माणसाला कोणत्याही विषयावर विचारच करता येईनासा झाला आहे उत्क्रान्तिवादाची मूलभूत कल्पना माणसाच्या मनात अलीकडे इतकी भिनून गेली आहे जगात कोणतीही गोष्ट तुटक व स्वतंत्र नसते, एकीच्या स्वरूपातून दुसरी उत्पन्न व्हावी, दुसरीतून तिसरी निघावी, अशा रीतीनेच जगात नानात्व उत्पन्न झाले आहे, प्रत्येक गोष्टीला वाढ व विकास असतो, प्रथमारंभी प्रत्येक वस्तूचे स्वरूप साधे व एकजिनसी असून, पुढे ते हळूहळू पालटत बहुविध व प्रगल्भ होते, एकमार्गीपणा सुटून ते नाना क्रिया करण्यास समर्थ होते, बीज वाढून वृक्ष व्हावा, कळी उमलून फूल व्हावे, तद्वत् जगातील यच्चयावत् सर्व गोष्टीमध्ये स्थित्यंतर व विकास होत असतो ह्या कल्पना उत्क्रान्तिवादाच्या बुडाशी आहेत व त्या जगात आज सर्वमान्य झालेल्या आहेत पुनर्जन्माविषयी प्राचीन लोकानी दिलेल्या प्रमाणात उत्क्रान्तिवादाचा फारसा संबंध सहजच आलेला नाही अर्वाचीन प्रमाणे मात्र बहुतेक सारी उत्क्रान्तिवादाच्या पायरीवर उभारलेली आहेत त्याचा विचार आपणास या प्रकरणात करावयाचा आहे

## मानवी उत्क्रान्ति

मनुष्याला, विशेषत त्याच्या मनाच्या नाना शक्तीना उत्क्रान्तिवाद लागू केला म्हणजे अगदी प्राथमिक स्थितीत माणसाचे मन अप्रबुद्ध, असमर्थ व निर्बल असते त्याचे विकार–विचार बालिश व पोरकट असतात, त्याच्या मानवी गुणाचे अकुर त्या वेळी बीजरूप असतात व पुढे ते सारे यथाकाल उत्क्रान्ति-क्रमानुसार वाढीस लागून फुलतात, आणि अशा रीतीने त्याची बुद्धि तेजस्वी बनते, त्याच्या भावना जोरदार व खोल होतात, आणि त्याची कार्यकुशलता अष्टपैलू होते असे मानले पाहिजे शाळेतल्या पहिल्या इयत्तेत जाणारा मुलगा जसा लहान व अज्ञ असतो तद्वत् मनुष्य कोटींतला अगदी खालच्या प्रतीचा मनुष्य होय शाळेतला अभ्यास

असवून मुलगा जसा तरतरीत व हुशार होतो, तद्वत् मनुष्य कोटीतला उच्च दर्जाचा मनुष्य होय पहिल्या इयत्तेत नुकताच गेलेला मुलगा व शाळेतील शिक्षणक्रम पुरा केलेला मुलगा यामध्ये विकासदृष्टया बरेच अतर असते, व ते अतर तोडण्यास पहिल्या इयत्तेतल्या मुलाला बरीच वर्षे लागतात तद्वत् मनुष्य कोटीतला अगदी खालच्या प्रतीचा मनुष्य व मनुष्य कोटीतला अगदी परमोच्च मनुष्य याच्यामध्येही फार अतर असते त्या कनिष्ठतम माणसाला ते एका जन्मात तोडण्यासारखे नसल्यामुळे त्याला त्यासाठी अनेक जन्म लागावे हे उघड आहे

नीचतम माणूस व श्रेष्ठतम माणूस यात किती अतर आहे ते पहा कित्येक रानटी जातींना एक, दोन, तीन याच्या पुढे आकडे मोजता येत नाहीत, तीनच्या पुढे "पुष्कळ" हा एकच सख्यावाचक शब्द त्याना माहीत असतो सीलोनमधील "वेद्दा" नावाची रानटी जात अगदीच वन्य नसून थोडीफार सुधारलेली आहे, पण त्याचा मेळावा एकदा जमलेला असताना त्यातल्या एका वेद्दाला नऊ बटाटे तीन माणसात सारखे वाटून देण्याचे काम करावयाचे होते काही वेळ ते बटाटे हातात नाचविल्यावर ते त्याने जमिनीवर माडले व डोके खाजवून प्रत्येकाला तीन तीन दिले या वाटणीचा त्या सबध जमातीला इतका अभिमान वाटला की जणू कोणी सीनियर रँगलर त्याच्या जातीमध्ये निर्माण झाला आहे ! ! [१] उलटपक्षी श्रेष्ठतम माणूस काय करू

---

[१] पहा, Morals in Evolution by L T Hobhouse खड १ पृ ८८ व E B Tyler कृत Primitive Culture खड १ पृ २४२. या पुस्तकात रानटी लोकाविषयी बरीच माहिती आहे Tyler ह्या ग्रथकाराचे Researches into the Early History of Mankind नावाचे पुस्तक प्रसिद्ध आहे त्यातही रानटी लोकाविषयी माहिती आहे. वेस्टरमार्ककृत Origin and Development of Moral Ideas या पुस्तकात

(टीप पुढील पानावर चालू)

शकतो ते पहा तो पृथ्वीवर बसून आकाशातल्या ताऱ्याची अंतरे मोजतो मैलात तो ती अतरे सागत नाही कारण मबध गावाची लाबीरुदी मोजण्यास जशी फूटपट्टी फार लहान पडते. तद्वत् आकाशातल्या ताऱ्याची अतरे इतकी अफाट आहेत की त्याबाबतत मैलाचे माप कामी येत नाही एका वर्षात प्रकाश जितके अतर जातो त्याला प्रकाशवर्ष म्हणतात या हिशोबाने एक प्रकाशवर्ष म्हणज सुमारे ६००० , ०० , ०० , ०० , ००० , मैल होतात या प्रकाशवर्षाच्या मापाने तो ताऱ्याची अतरे मोजतो कोणते ग्रहण केव्हा लागेल, कोणता धूमकेतु केव्हा दिसेल, रविबिबा-वरुन शुक्राचे सक्रमण केव्हा होईल त्याचे हिशेब तो बिनचूक सागतो तो सूर्याचे वजन सागतो, व सूक्ष्मात सूक्ष्म असणाऱ्या परमाणूचे व त्याहूनही बारीक अशा विद्युत्कणाचेही वजन काढतो

## रानटी माणूस

उत्क्रातिदृष्टचा कनिष्ठ माणूस आणि श्रेष्ठ माणूस याच्या बुद्धिमत्तेत किती मोठे अतर आहे हे यावरून दिसून येईल नीति-मत्तेच्या बाबतीतही तोच प्रकार आहे कॅलिफोर्निया व टॉगा बेट यातील रानटी लोकाच्या भाषेमध्ये न्याय, माणुसकी, सद्गुण–दुर्गुण याना नीतिवाचक शब्दच नाहीत ऑस्ट्रेलिया, फिजी बेट, दक्षिण आफ्रिका येथील कित्येक रानटी जातीत माण-साच्या जिवाला चिलटापेक्षा जास्त किमत असत नाही बारी-कशा गोष्टीवरूनही एक माणूस आपल्या मित्राचा जीव घेईल, व त्याचा समाज त्याला दोष देणार नाही ठार मारलेल्या माणसाच्या कुटुबाची गोष्ट सोडली तर, तो खून कोणाच्याही खिसगणतीतही असत नाही अमेरिका, ब्राझील, दक्षिण समुद्रातील बेटे,

---

(टीप मागील पानावरून)

रानटी लोकाविषयी पुष्कळ माहिती आलेली आहे. ह्या किंवा ह्यासारख्या दुसऱ्या पुस्तकात रानटी लोकासबधाची विश्वसनीय माहिती आमच्या वाच-काम मिळेल.

ऑस्ट्रेलिया, आफ्रिका यामधील काही रानटी जातीमध्ये आईबाप व वडील माणसे म्हातारी झाली, कामाला निरुपयोगी झाली, त्याचे हातपाय थकून त्याना अन्न मिळविता येत नाही अशी स्थिति आली, म्हणजे मुले त्याना सोडून जातात व ती त्या जागीच अन्नान्न करून मरतात एक जातीत तर वयस्क बापाला मुले उताणा निजवितात, त्याच्या मानेवर एक लाब काठी आडवी ठेवून तिच्या दोन्ही टोकावर मुलगे बसतात व बापाचा प्राण गेला म्हणजे त्यास तसाच टाकून चालते होतात काही नीग्रो जातीत आजारी माणसाना इतरानी टाकून जावे अशी रूढि आहे मादागास्कर बेटातील रानटी लोक, कोणी माणूस आजारी पडून बेशुद्ध झाला असला म्हणजे तशाच स्थितीत त्याला रानात नेऊन टाकतात, व यदाकदाचित् तो बरा होऊन परत आला तर धोंडे मारून त्याला यमसदनास पाठवितात सॅडविच बेटातील रानटी जातीत लहान मुले ठार मारण्याची चाल असून एकदर अर्भकापैकी सुमारे दोनतृतीयाशाची विल्हेवाट अशीच होत असते. नरमास खाण्याची चाल अनेक रानटी लोकात आहे काही लोक शत्रुजातीतील माणसाचे चदन करतात तर काही आपल्याच जातीतला किंबहुना आपलाच नातेवाईक धरून त्याची चटणी उडवतात फिजी बेटात पूर्वी नरभक्षक जाती फार असत ब्राझील व आफ्रिका खड यातही अनेक नरभक्षक रानटी लोक आहेत अनेक रानटी लोक माणसाचे मास म्हणजे उत्कृष्ट पक्वान्न असे समजतात व पुष्कळदा एक माणूस दुसऱ्याला जो ठार करतो तो मास खाण्याच्या बुद्धीने करतो ऑस्ट्रेलियातल्या काही रानटी लोकानी एखादे बाळसेदार मूल पाहिले म्हणजे याचा घास किती गोड लागेल हा विचार त्याच्या मनात येतो, आणि मुलाची आई जवळपास नसली तर लगुड प्रहार करून ते त्याला ठेचून टाकतात अनेक रानटी लोकात चोरीला दोष नाही. चोर सांपडला नाही तर चोरीची ते वाहवा करतात. कित्येक रानटी लोक आघोळ करीत नाहीत, व ज्या भाड्यातून

कुत्र्याने अन्न खाल्ले असेल ते न विसळता ते त्यातच आपले जेवण करतात

अनेक रानटी लोकात वैवाहिक नीतिमत्तेचा मागमूसही नसतो. एस्किमो जातीत स्त्रीपुरुषाचे सर्रास व्यवहार होतात व त्या गोष्टी एकमेकास सांगून व ऐकून ते लोक स्वतःची करमणूक करून घेतात [१] अनेक रानटी जातीत लग्नापूर्वी मुलगी कुमारिका असली पाहिजे अशी अट नसते, व कुमारिका फारशा सापडतही नाहीत, तसेच लग्नापूर्वी मुलगी गर्भार राहिली तरी त्याचा दोष नसतो काही रानटी लोकात सामुदायिक लग्ने होतात एका गटातील व्यक्तीला आपल्याच गटातील व्यक्तीशी विवाह करता येत नाही, तो दुसऱ्या गटातील माणसाशीच करावा लागतो पण एका गटातील वाटेल त्या व्यक्तीला दुसऱ्या गटातील वाटेल त्या व्यक्तीशी लग्न करण्याचा हक्क असतो आज ज्या दोघाचा लग्नव्यवहार झाला, त्यानी परस्परास सोडून उद्या दुसऱ्याशी लग्न व्यवहार करण्यास आडकाठी नसते मात्र ही टेपरवारी नवराबायकोची जोडपी केव्हाही एकाच गटातील असल्यास चालत नाही [२] काही जातीत दोन गटातील दोन स्त्री-पुरुषाचे हक्क जास्त प्रभावी असतात, व विशिष्ट पुरुषाच्या परवानगीशिवाय दुसऱ्या पुरुषाला बायको आपली म्हणता येत नाही हिंदुस्थानातल्या खोंड जातीमध्ये धाकट्या भावाचे लग्न होईपर्यंत त्याला मोठ्या भावाची बायको घेण्यास अडचण नसते त्या जातीत नरमेध करतात,[३] व रामोशी जातीचा धंदा तर पिढीजात चोरी करण्याचा होता असे इतिहास सांगतो [४]

---

१ पहा, Origin and Development of Moral Ideas by E Westermark खंड २ पृ ४२२–४२३.

२ पहा, कित्ता पृ ३९३.

३ ज्ञानकोश खंड १२ पृ १२५ "खोंड" पहा

४ कित्ता खंड १९ पृ १०१ "रामोशी" पहा

असल्या हीनतम माणसाशी[१] गौतम बुद्धाची, श्रीकृष्णाची किंवा दुसऱ्या एखाद्या ऋषितुल्य आदर्श मनुष्याची तुलना करून पहा, म्हणजे त्यामधील अंतर किती मोठे आहे त्याची कल्पना येईल. स्वतःच्या सुखास्तव क्षुद्र कारणासाठी दुसऱ्याचा खून करणारा, म्हाताऱ्या आईबापास ठार मारणारा, माणसाचे मांस खाऊन ढेकर देणारा, आणि कोवळ्या अर्भकाचा जीव घेणारा, असा जो रानटी मनुष्य त्याची तुलना गौतम बुद्धाशी करा. जो गौतमबुद्ध आपल्या राजवाड्यात अनेक वर्षे गजान्त लक्ष्मीचा उपभोग घेत होता, ज्याला ईश्वरकृपेने कर्तव्यदक्ष व प्रेमळ पत्नी लाभली असून जिच्या मांडीवर एक सुकुमार बालक खेळत होते, तो नग्पगुव सहजासहजी आपल्या रथातून शहरात हिंडत असता त्यास एक प्रेत, एक वृद्ध माणूस, एक रोगी व एक सन्यासी हे दृष्टीस पडावे, त्याच्या मनात तत्काल कालवाकालव व्हावी, जगात दुःख का आहे ते मी शोधणार, व सर्व जगाचे दुःख हलके करणार, असा त्याने संकल्प करावा, सर्व ऐषआरामावर लाथ मारून दुःखाचे कारण शोधण्यासाठी वर्षानुवर्ष एकाकी

---

१ जगातील सर्वच रानटी जाती सर्व बाबतीत अत्यंत हीन असतात असा अनुभव नाही. काही रानटी लोक गरीब असतात, मायाळू व उदारही असतात. काहीत स्वच्छ रहाणी असते, काहीत पातिव्रत्य हा गुण मानला जातो. काहीत चोरी, खून हे अपराध गणले जातात. काही रानटी लोक एकंदरीतच जरा उच्च प्रकारचे असतात. तर दुसरे कित्येक गोष्टीत बरे, पण इतर बाबतीत फारच हीन असतात. जे रानटी लोक थोडेसे बरे आहेत ते अगदी खालच्या स्थितीतले नव्हेत, ते उत्क्रान्तिमार्गाने किंचित् पुढे आलेले आहेत, असे उत्क्रान्तिदृष्ट्या मानले पाहिजे. ते कसेही असले तरी वर दिलेली उदाहरणे काल्पनिक नसून प्रवासी लोकांनी पाहिलेली आहेत, हे आमच्या वाचकांनी विसरू नये. वर लिहिलेले रानटी लोकही नीचतम अवस्थेतील असण्याचा संभव नाही. ज्यांच्या चालीरीति प्रवाश्यांना पहाता येतात ते थोडेसे तरी सुधारलेले असले पाहिजेत हे उघड आहे. अगदी कनिष्ठ लोक चवकशी करणारास जिवंत ठेवतील असे वाटत नाही.

उग्र तप करीत त्याने वणवण हिडावे, ते कारण सापडल्यावर सर्व जगास शहाणे करण्यासाठी चाळीस पन्नास वर्षे अश्रान्त श्रम करावे आणि देह सोडल्यावर अडीच हजार वर्षेपर्यंतही त्याची कीर्ति दिगत दुमदुमत रहावी असा जो गौतम बुद्ध, त्या बुद्धामध्ये आणि त्या रानटी मनुष्यामध्ये जमीनअस्मानाइतके अतर नाही का ?

## जमीन-अस्मानांइतकें अंतर

एकपत्नीव्रताची कल्पनाही ज्याच्या मनास शिवलेली नाही, असा दर दोन दिवसानी नवी बायको शोधणारा विषयासक्त मनुष्य घ्या, आणि लहानपणीच विश्वाची चिता करण्याची तळमळ ज्याच्या मनाला लागली आहे, त्या विश्वाच्या चितेत आणि जगाच्या सेवेत अतराय होईल म्हणून आईबापाच्या जुलुमामुळे लग्नास उभे राहिले असताना " सावधान " शब्दाने जागे होऊन घरातून पळून गेलेले समर्थ रामदासस्वामी घ्या या दोन व्यक्तीत अफाट अतर दिसत नाही का ? हा विषयासक्त रानटी माणूस विषय-वासनेच्या पायी अनेकाशी द्वेष मत्सराची भाडणे भाडत अकस्मात् अपमृत्यूच्या मुखी पडेल किवा कामवासनेच्या पकात अधिकाधिक खोल बडत जाऊन निस्सत्व व विकलाग होत्साता हळूहळू यम-सदनाची वाट धरील त्याला दुसरी भवितव्यता नाही उलट पक्षी हे आमचे बालब्रह्मचारी समर्थ घरातून गेल्यावर बारा वर्षे-पर्यंत अभ्यास व तपश्चर्या करतात, पुढे आणखी बारा वर्षे डोळे उघडून देशपर्यटन करतात, "पहिले ते हरिकथानिरूपण। दुसरे ते राजकारण।" हा बीजमत्र सबध महाराष्ट्राला शिकवतात, त्यासाठी सप्रदाय स्थापून हजारावर मठ उभे करतात, प्रवृत्ति आणि निवृत्ति याचा सुदर मिलाफ करून तो धडा महाराष्ट्राच्या गळी उतरवितात, जगातल्या एका आदर्श राजाचे आदर्श गुरु होतात, आणि त्याने स्वत:स अर्पण केलेले राज्य त्याला परत देऊन ' हे राज्य, तू ईश्वराचा सेवक म्हणून निष्काम बुद्धीने

चालव,' असे सागून कृतार्थ होतात. या दोन माणसात उत्क्रान्ति-दृष्ट्या इतके अतर आहे की ते एका जन्मात चालून सपावयाचें नाही. त्यासाठी अनेक जन्माची आवश्यकता आहे.

मानवी उत्क्रान्तीचा हा जो लाबच लाब मार्ग आहे, त्या मार्गावर सामान्य प्रतीचा माणूस एका जन्मात फारसा पुढे जाऊ शकत नाही, हे सिद्ध करणे कठिण नाही ऑफिसातला शिपाई, स्टेशनवरचा हमाल, मार्केटात भाजी विकणारी बाई, किवा मुलाची खेळणी विकणारा फेरीवाला, ही आपल्या समाजातील अगदी सामान्य दर्जाची माणसे होत अशा माणसास त्याच्या वृद्धापकाळी आपण विचारले की या जन्मात तुम्ही उत्क्रान्तिमार्गावर किती वाटचाल केलीत ? तर तो प्रश्न त्यास समजण्याचीही मारामार पडेल डॉक्टर, वकील, जज्ज, वर्तमानपत्रकार, इजिनीयर, शिक्षक ही माणसे समाजात जराशी वरची आहेत असे आपण समजतो अगदी प्राथमिक स्थितीच्या गावापासून निघून प्रत्येक माणसाला आदर्श मनुष्याच्या पुण्यक्षेत्रास जाऊन पोहोचणे आहे. त्या मार्गातले अतर या जन्मी तुम्ही किती तोडलेत, असा आपण या लोकास प्रश्न केला तर आपण पुष्कळ अतर चालून आलो असे म्हणणारी फारशी माणसे आपणास आढळून येणार नाहीत जन्मापासून मरेपर्यंतचा आपण असल्या माणसाच्या एका जन्माचा इतिहास पाहिला तर, त्याच्या बुद्धिमत्तेत फारसा विकास झाला, चरित्र शुद्ध होऊन नीति उच्च दर्जाची झाली, दुर्गुण जाऊन सद्गुण आले, अप्रबुद्धपणा जाऊन नाना प्रकारची कार्यक्षमता त्याच्या अगी आली, असे आपणास मोठ्याशा प्रमाणावर आढळून येणार नाही

ही लाबची यात्रा आहे, व बहुतेक माणसे तर मुगीच्या पायाने चालत असतात अर्थात् ती यात्रा सपविण्यास जन्मरूपी अनेक दिवस लागतील असे मानणे भाग आहे दर जन्मात माणूस थोड्याशा नवीन गोष्टी शिकतो, ज्या त्याने पूर्वीच्या अनेक जन्मात शिकून आत्मसात् केलेल्या असतात, त्या त्याच्या स्वभावात

जात्याच दिसून येतात, आणि ज्याचा त्याने अद्याप धडा गिर-विलेला नाही त्या त्याला लवकर साधन नाहीत असे मानले तरच हा प्रश्न सुटेल

लहान मुलाने कमी पावसाळे पाहिले म्हणून तो अज्ञ असतो, मोठ्या माणसाने जास्त पावसाळे पाहिले म्हणून तो त्याच्या मानाने सुज्ञ असतो तद्वत् अगदीच थोडे जन्म होऊन ज्याच्या गाठी तुटपुंजाच अनुभव पडला आहे, त्यास आपण रानटी माणूस म्हणतो. ज्याचे जन्म अधिक होऊन ज्याला बराच अनुभव मिळाला आहे त्याला आपण सुधारलेला माणूस म्हणतो; व ज्याच्या गाठी सपूर्ण अनुभवाचा सचय झाला, त्याला ऋषि, बुद्ध, ख्राइस्ट, अव-तार अशी आदर्श-मनुष्य-वाचक नावे देतो.

## अलौकिक प्रतिभा

काही काही मुलामध्ये एकदा गुण जन्मत.च फार विकास पावलेला आढळतो त्याना आपण प्रतिभावान् मुले असे म्हणतो प्रतिभावान् मुलाना इग्रजीत Infant Prodigies असे म्हणतात त्याच्या प्रतिभेचा अन्वयार्थ लावावयाचा तर पुनर्जन्म मानल्या-शिवाय गत्यतर नाही यूरोपीय सगीताचार्य मोझार्ट हा चार वर्षाचा होण्याच्या अगोदर गाणी रचून वाजवी बीथोवेन हा आठ वर्षाचा असताना त्याचे सार्वजनिक जलसे चालू असत, व त्याने रचलेले काही गायनशास्त्रावरील ग्रथ तो दहा वर्षाचा असताना प्रसिद्ध झाले होते ह्युमेल नावाचा सगीतज्ञ नवव्या वर्षी जलसे करू लागला शूबर्ट याने अकराव्या वर्षी नवीन गति रचिल्या इग्रजी ऑर्गन वाजविणारा सॅम्युअल वेसले नावाचा एक सगीताचार्य होता तो तीन वर्षाचा असताना ते वाद्य वाजवी काही गति त्याने आठव्या वर्षी रचल्या होत्या नाट्यकलेत लहानपणी ज्याची प्रतिभा प्रकट झाली, अशी पुष्कळ उदाहरणे आढळतात वुइल्यम हेन्री वेस्ट बेटी नावाचा एक नट इग्लडात गेल्या शतकात होऊन गेला अकराव्या वर्षी तो रगभूमीवर प्रथम आला शेक्सपीयरच्या अगदी

कठिण भूमिका तो उत्कृष्ट रीतीने करी त्यामुळे तो इतका लोकप्रिय झाला होता की एकदा त्याचे हॅम्लेट नाटक पहाण्यासाठी पार्लमेंटच्या कामन्स सभेने एका दिवसाची सुटी घेतली होती [1]

आपल्या महाराष्ट्रातही असली उदाहरणे उपलब्ध आहेत मास्टर मनहर बर्वे हे पुण्या–मुबईकडे नावाजलेले एक सुप्रसिद्ध सगीतज्ञ आहेत त्याचा जन्म १९१० साली मुबईस झाला व अगदी लहानपणापासून त्याची सगीत प्रतिभा प्रकट झाली त्याचे वडील गवई होते एकदा त्याची बहीण बाजाची पेटी वाजवीत असताना हे मनहर बर्वे ती ऐकत होते. त्या प्रसगी बहिणीने पेटीचे सूर वाजवावे व मनहर बर्वे यानी ते ओळखावे व स्वत च्या कठातून काढून दाखवावे असा त्या भावडाचा खेळ चालला होता त्या वेळी मास्टर बर्वे याचे वय सुमारे साडेतीन वर्षाचे असावे हा खेळ त्याच्या वडिलानी आडून पाहिला व या मुलाला गायनशास्त्रात जात्याच प्रावीण्य आहे हे ओळखले मग त्याचे वडील त्याना लहान सतार, जलतरगाच्या वाटचा वगैरेसारखी खेळणी देत असत व खेळ म्हणून ते सतार व जलतरग-वादन करू लागले माडवी विभागातील व्यापाऱ्यानी त्याचा पहिला सार्वजनिक जलसा मुबईस केला त्या वेळी त्याचे वय ६ वर्षाचे होते त्या जलशाच्या समारभात श्री सरोजिनी नायडू अध्यक्ष होत्या त्या प्रसगी बर्वे यानी गायन केले व सतार, दिलरबा, व्हायलिन, जलतरग ही वाद्ये वाजवून श्रोत्याना थक्क करून सोडले या जलशात त्याना एक पदक व रु १००० ची थैली अर्पण करण्यात आली त्या वेळी श्री सरोजिनी नायडू यानी त्याचे जलसे ठिकठिकाणी करावे अशी त्याच्या वडिलाना सूचना करून परगावच्या अनेक लोकाना ओळखपत्रे दिली तदनुसार त्याच वर्षी कराची बनारस कलकत्ता वगैरे ठिकाणी सार्वजनिक जलसे करण्यात आले व त्यात मास्टर मनहर बर्वे या सहा वर्षाच्या मुलाच्या अलौकिक गायनपटुत्वाबद्दल श्रोत्याची खात्री झाली

---

१ पहा Encyclopedia Britannica आवृत्ति १४ वी १९२९ सालची खड १८ पृ. ५४८

दुसरे उदाहरण शिवकुमार सीताराम कोमकली तथा कुमार-गधर्व याचे आहे पाच वर्षाचे असताना कुमार गधर्व एकदा सवाई गधर्वाच्या गायनाच्या जलशाला गेले होते त्या जलशात सवाई गधर्वानी वसत राग गाइला हा एकदा ऐकलेला राग जलसा सपून घरी आल्यावर कुमार गधर्वानी सर्व ताना व आलाप यासह जसाच्या तसा गाऊन दाखविला व अशा रीतीने कुमार गधर्व याची अत स्थ सुप्त प्रतिभा अचानकपणे प्रकट झाली हे पाहून त्याचे वडील आश्चर्यचकित झाले मोठमोठ्या गवयाचे ग्रामोफोन रेकॉर्डस् ऐकून त्याचीही ते हुबेहुब नक्कल करून दाखवू लागले तेव्हा त्याच्या वडिलानो त्याना गायनशास्त्र शिकविण्याची व्यवस्था केली आठव्या वर्षापासून ठिकठिकाणी त्याचे सार्व-जनिक जलसे सुरू झाले त्याचे लहानपणचे गायन ऐकून अल्ला-दीया खा फैय्याज खा हे गायनसम्राटही मत्रमुग्ध होत तात्या-साहेब केळकर व जवाहरलाल नेहरू यानीही त्याचे गायन ऐकून त्याची पाठ थोपटली आहे आज हे गायक म्हणून सुप्रसिद्ध झाले आहेत त्याच्या गायनात नावीन्य व कल्पकता हे गुण असून त्यानी कित्येक नव्या रागरागिणी स्वयप्रेरणेने निर्माण केल्या आहेत [1]

असली मुले आपल्या त्या एका विषयाखेरीज इतर बाबतीत चारचौघासारखीच प्राय असतात लहानपणीच त्याच्यामध्ये ही अलौकिक करामत दिसत असल्यामुळे त्याच्यात ती शिक्षणा-मुळे उत्पन्न झाली असे म्हणण्यास वाव नाही मुलगा चौरस बुद्धीचा आहे, सर्व बाबतीतच तो तरतरीत व हुशार आहे, तेव्हा तो नाटचकलेत अथवा गायनातही कुशल असणारच असे म्हणण्या-सही या ठिकाणी वाव नाही कारण इतर गोष्टीमध्ये बहुधा त्याच्या अगी कोणतेही विशेष गुण दिसून येत नाहीत, इतकेच नव्हे तर इतर बाबतीत ती मुले कधी कधी मदही असल्याचे आढळते त्या एका विषयावर पूर्वीच्या एका किवा अनेक जन्मात त्या माणसाने

१ पहा, सगीत-कला-विहार अक जानेवारी १९५८ पृ २६ ते ३५ वरील श्री रा स दाते याचा कुमारगधर्व याच्या चरित्राबद्दलचा लेख

सारखे परिश्रम केले असले पाहिजेत, असे मानले तरच प्रतिभावान् मुलाचे असले प्रश्न समाधानकारक रीतीने उलगडतील.

आकडेशास्त्रातही अगदी लहानपणीच उज्ज्वल प्रतिभा असलेली अलौकिक मुले आढळतात जगद्विख्यात गणिती श्री रामानुजम् याचे प्रावीण्य ते शाळेत शिकत असताना प्रकट झाले विद्युत् शास्त्रज्ञ[१] आपेर याचे आकडेशास्त्रातील प्रावीण्य चवथ्या वर्षी उदयास आले गणित शास्त्रात प्रसिद्ध असलेल्या गॉसचे प्रावीण्य तिसऱ्या वर्षी दिसू लागले ही माणसे जगातल्या बुद्धिमान माणसात अग्रेसर म्हणून गणता येण्याजोगी होती आर्चबिशप व्हटले, प्रो सफर्ड व मि बिडर ही माणसे वरच्या माणसाइतकी अलौकिक बुद्धीची नसली तरी चागली हुशार होती पहिल्याची प्रतिभा तिसऱ्या वर्षी, दुसऱ्याची सहाव्या वर्षी व तिसऱ्याची दहाव्या वर्षी निदर्शनास आली डेस, मॉडो, व प्रोलॉंगो हे इतर बाबतीत जवळ जवळ ढ च होते. पैकी डेस लहान असतानाच आपली आकड-प्रतिभा त्याने दाखविली, व मॉडो व प्रोलॉंगो याची ती शक्ति अनुक्रमे दहाव्या व सहाव्या वर्षी प्रकट झाली डेस हा इतका अल्पबुद्धि होता की युक्लिडचा सिद्धान्त म्हणजे काय याची कल्पना जन्मभरही त्याच्या डोक्यात उतरू शकली नाही एका गृहस्थाने गणितातल्या साध्या गोष्टी त्याला शिकविण्याचा एकसारखा दीड महिना प्रयत्न केला, पण फुकट परतु गॉसच्या शिफारशीवरून हॅबुर्गच्या ॲकॅडमी ऑफ सायन्सेस या सस्थेने डेसला पैसे देऊन त्याच्याकडून सुमारे ऐशी लक्ष रकमेपर्यतच्या साऱ्या आकड्याचे अवयव पाडणे, अविभाज्य आकडे शोधणे व त्यासबधीची कोष्टके व तक्ते तयार करणे हे काम करून घेतले तज्ज्ञ लोक असे सागतात की हे काम सामान्य माणसाला सबध आयुष्यातही पुरे होण्याजोगे नाही पण डेसने ते बारा वर्षात सपवून टाकले युक्लिडचा पाचवा सिद्धान्त जरासा कठिण असल्यामुळे लोक थट्टेने

---

१ प्रतिभावान मुलाविषयीची काही माहिती Myers कृत Human Personality खड १ मधील Genius नावाच्या प्रकरणात पृ ८०-८५ वर सापडेल

त्याला गर्दभाचा पूल ( Asse's Bridge ) असे म्हणत असतात ह्या गर्दभाच्या पुलावरून पुढे न जाता कोणी माणसाने जर गणित शास्त्राची उपयुक्त सेवा केलेली असली तर तो मान एकट्या डेमलाच दिला पाहिजे असा त्याच्याविषयी एका ग्रंथकाराने विनोद केला आहे. असली मुले आकड्यांचे हिशेब किती जलद करीत असतात ते पाहिले म्हणजे आश्चर्य वाटते उदाहरणार्थ १७८६१ सारखी संख्या बिडर याला सांगितली की तो एकदम ३३७ व ५३ हे तिचे अवयव आहेत असे सांगे व्हिटो मँगिया मील या दहा वर्षांच्या एका धनगराच्या मुलाला असली प्रतिभा होती त्याला एकदा ॲकॅडमीसमोर आणण्यात आले होते ३७९६४१६ या रकमेचे घनमूळ काय, हा प्रश्न त्यास विचारण्यात आला सुमारे तीस सेकंदात त्याने १५६ घनमूळ असे उत्तर दिले व तें बरोबर निघाले बेंजामिन ब्लाइथ नावाचा एक सहा वर्षांचा मुलगा होता त्याला ज्या दिवशी सहावे वर्ष लागले त्या दिवशी सकाळी तो बापाबरोबर फिरावयास गेला मुलाने सहज बापाला विचारले माझा जन्म किती वाजता झाला ? बाप म्हणाला-पहाटे चार वाजता, मुलाने पुन विचारले आता किती वाजले ? बाप म्हणाला सात वाजून पन्नास मिनिटे झाली आहेत हे ऐकून मुलगा काही अंतर पुढे चालत गेला व थोड्या वेळाने पाठीमागे वळून मी अमुक अमुक सेकंद जगलो आहे असे बापास म्हणाला बापाने ती सेकंदाची संख्या टिपून घेतली, व घरी आल्यावर हिशेब करून पाहिला त्यात त्याला १७२८०० सेकंदाची चूक आढळली तेव्हा त्याने मुलाला बोलवून इतक्या सेकंदांनी तुझे उत्तर चुकले आहे असे त्याला सांगितले मुलगा तात्काळ म्हणाला, "बाबा इ स १८२० व १८२४ या दोन लीप वर्षांचे दोन अधिक दिवस तुम्ही धरावयास चुकला आहा माझेच उत्तर बरोबर आहे" आणि खरोखरीच ते बरोबर होते ! !

आकडेशास्त्रात प्रावीण्य मिळविलेली मुले आपल्या हिंदुस्थानातही मधून मधून आढळतात, व कधी कधी वर्तमानपत्रात त्यांच्या संबंधीचे उल्लेखही येतात पण त्यांची सविस्तर माहिती

एकत्र दिलेली सापडत नाही म्हणून आपल्याकडील उदाहरणे येथे देता आलेली नाहीत

## उत्क्रान्तिवादाला आव्हान

उत्क्रान्तीचा सिद्धान्त शिकवितो की सृष्टपदार्थात कोठेही तुटकपणा नाही, सृष्टीतील सर्व वस्तूंची एक अखंड साखळी आहे, व या साखळीच्या एका दुव्यातून दुसरा, दुसऱ्यातून तिसरा असे सारे दुवे ओळीने निघालेले आहेत जवळजवळचे दुवे घेतले की त्यात किंचित्सा विकासदृष्ट्या फरक असला तरी त्यांचे सादृश्य डोळ्यात भरते पण दूरदूरचे दुवे पाहिले की या फरकाची एकंदर मोठी बेरीज होऊन ते फरक फार मोठे वाटतात, व एकाच साखळीचे ते दुवे आहेत ही गोष्ट ध्यानात येईनाशी होते घोड्याचे पाऊल व माणसाचा पंजा हे एका साखळीचे दूरदूरचे दुवे असल्यामुळे ते आपणास अगदी वेगळे वाटतात पण पूर्वी पृथ्वीवर घोड्यासारखे जे प्राणी होते त्याचे आज काही अवशेष उपलब्ध आहेत त्यावरून त्या प्राण्याच्या पायाला माणसाच्या पंजासारखी पाच बोटे होती असे दिसून येते त्यानंतरच्या कालखंडातील अवशेष त्या प्राण्याला चार व नंतर तीन बोटे होती व कमी झालेली बोटे झडून लहान झाली व त्याच्या खुराच्या पाठीमागे गेळ्यासारखी दिसू लागली हे शास्त्रज्ञानी त्याच्या अवशेषावरून सिद्ध केले आहे हा व अशाच प्रकारचा त्यांनी दिलेला पुरावा आपण पाहिला म्हणजे माणसाच्या मधल्या बोटाचे नख भले मोठे होऊन आजच्या घोड्याची टाप झाली, व त्याची इतर बोटे टापेच्यावर मागल्या बाजूस लहान बोटासारखी गेळ्याच्या रूपाने राहिली हे दिसून येते हे मधले अवशेषाचे दुवे सापडल्यामुळे माणसाचा पंजा व घोड्याचा खूर हे एकाच साखळीचे परस्पर सदृश दुवे आहेत हे सिद्ध करता येते सृष्टपदार्थात जेथे आपणाला खिंड दिसते तेथील दुवे उत्क्रान्तिवाद दाखवून देतो आणि सृष्टीची सांखळी अखंड आहे हा सिद्धान्त प्रस्थापित करतो. अशा रीतीने सृष्टपदार्थातील सर्व आभासिक खिंडारे बुजवून त्या सर्वांची व्यव-

स्थिन सगति लावण्याकरिताच उत्क्रान्तिवादाचा अवतार आहे. जर उत्क्रान्तिवाद माणसाच्या मनालाही लावावयाचा असेल–आणि मर्व मृष्टीला तो लावावयाचा असेल तर माणसाच्या मनालाही तो लावणे अवश्य आहे– तर त्या क्षेत्रातील खिडारेही त्याने बुजवून दाखविणे जरूर आहे मनुष्यप्राणी देवाने वेगळा निर्मिलेला नाही, मानवसम वानराशी त्याचे लागेबाधे आहेत व प्राणिमालिकेतलाच तो एक दुवा आहे हे जसे उत्क्रान्तिवाद दाखवितो, तसेच वर लिहिलेल्या मुलाच्या प्रतिभेसबधाने त्याने दाखविणे जरूर आहे त्याची अलौकिक प्रतिभाही वेगळी निर्मिलेली असणे शक्य नाही ती जर या जन्मीची कमाई नसेल–– आणि त्या मुलाच्या बाबतीत ती या जन्मीची कमाई नाही हे स्पष्ट आहे–– तर त्या प्रतिभेचा आरभ पूर्वीच्या एका किवा अनेक जन्मी झालेला होता असे म्हणून ते दुवे उत्क्रातिवादाने ओळखावयास नकोत काय?

आकडे शास्त्रात पारगत असणाऱ्या या प्रतिभावान् मुलापैकी काहीची ही प्रतिभा सर्व जन्मभर टिकली, पण बऱ्याच जणाची वयोमानाबरोबर कमी किवा अजिबात नाहीशी झाली असा पुरावा आहे पुनर्जन्म न मानल्यास या गोष्टीचा उलगडा करणे कठिण आहे पुनर्जन्म मानल्यास त्याची उपपत्ति लावता येते ही जर पूर्वजन्मीची कमाई असली तर ते मन किवा तो जीव नवीन देहात आल्यावर त्याला ती त्या देहाच्या द्वाराने प्रकट करणे कठीण जावे हे साहजिक आहे लहान मुलाचा देह सस्कारक्षम व कोवळा असतो व त्या वेळी त्या कमाईची छाया देहावर पाडता आली तरी पुढे माणूस नाना उद्योगात व्यग्र होतो, त्याचा देह राठ व जून होतो, व विशेषत परिस्थिति अनुकूल नसेल व त्या गुणाच्या अभिव्यक्तीसाठी देहास योग्य ते खाणेपिणे, वळण व शिस्त ही मिळत नसतील तर ती छाया तेव्हा देहावर उमटवणे दुर्घट व्हावे यात नवल नाही काही माणसास हे आकडेशास्त्रातले हिशोब करता आले तरी ते आपणाला कसे करता येतात ते त्यांना नीट सांगता येत नसे. याचाही उलगडा पुनर्जन्माच्या

उपपत्तीने होण्याजोगा आहे एकादी गोष्ट पुन पुन्हा करून ती आपल्या अगवळणी पडली म्हणजे आपणाला ती फटक्यासरशी करता येते, पण ती कशी केली त्याचे भान रहात नाही पूर्वजन्मी जर हे हिशोब करण्याचा माणसाने उद्योग केला असेल, त्यात प्रावीण्य सपादन केले असेल तर ती गोष्ट अगवळणी पडल्या-सारखी चटकन् होऊन जावी व तिची प्रक्रिया मागता येऊ नये हे साहजिकच आहे

## एक आक्षेप

या प्रकरणात स्वीकारलेली जी विचाराची दिशा आहे तिच्यावर उत्क्रान्तिवाद्याकडून एक आक्षेप येण्याजोगा आहे तो असा की माणसाची जी उत्क्राति होते ती आम्ही दर्शविलेल्या पद्धतीने होत नाही. एका जन्मी माणसाच्या मनाचा थोडासा विकास व्हावा, मग त्याने दुसऱ्या जन्मी दुसरा देह घेऊन त्यात त्याचा आणखी काही विकास व्हावा, पुढे तिसरा जन्म घेऊन विकासाच्या मार्गात आणखी त्याने पुढे जावे असे जे आम्ही म्हटले आहे, ते बरोबर नसून एका पिढीतले गुण दुसऱ्या पिढीत उतरतात, ते तेथे थोडेसे विकास पावतात, मग ते तिसऱ्या पिढीत उतरतात आणि तेथे त्याचा आणखी विकास होतो व अशा तऱ्हेने आनुवशिक सस्कार पिढ्यान्‌पिढ्या वाढत जाऊन मानवी उत्क्रांति होत असते असे उत्क्रांतिवादी लोक म्हणण्याचा सभव आहे अर्थात् मनुष्याचा विकास अशा रीतीने होत असतो असे मानले तर पुनर्जन्म मानण्याची आवश्यकता नाही हे उघड आहे अप्रबुद्ध व नीतिविहीन असा रानटी माणूस म्हणजे थोडे जन्म घेतलेला जीव होय, बुद्धिमान् व सद्‌गुणी माणूस म्हणजे जास्त जन्म घेऊन अनुभवाने अधिक शहाणा झालेला माणूस होय, असे आमचे म्हणणे आहे. पण काही उत्क्रांतिवादी मडळी म्हणतील की रानटी आईबापाच्या पोटी जन्मलेला व त्या आईबापापासून हीन सस्कार घेऊन आलेला माणूस म्हणजे रानटी माणूस

होय सुबुद्ध व भल्या आईबापाच्या पोटी येऊन त्याचे चागले मस्कार प्रकट करणारा माणूस म्हणजे त्या गावटी माणसा-पेक्षा श्रेष्ठप्रतीचा माणूस होय मर्व आयुष्यभर माणूस अनुभव गाठी बाधतो व मरून जातो त्या अनुभवाचे सस्कार त्याच्या सततीत उतरतात व ही पुढली पिढी त्या मस्कारामुळे जात्याच थोडीशी मुधारलेली असते ही पिढी स्वत आणखी अनुभव सपादन करते आणि ह्या दोन्ही पिढ्याच्या अनुभवाची बेरीज होऊन तिचे सस्कार तिसऱ्या पिढीला मिळतात व ती दुसऱ्या पिढीपेक्षा थोडीशी अधिक श्रेष्ठ होते अशा रीतीने मानवी सुधारणा होत असते मनुष्य जातीला उत्क्रातिवाद लागू आहे हे खरे पण तो अशा रीतीने लागू केला पाहिजे, व तसा तो लागू केला म्हणजे पुनर्जन्माचा प्रश्नच येत नाही कित्येक उत्क्रान्ति-वादी असे म्हणण्याचा सभव आहे

याला उत्तर आहे ते असे की, आज उपलब्ध असलेला शास्त्रीय पुरावा वरील कल्पनेच्या अगदी विरुद्ध आहे आईबापाचे कित्येक मस्कार मुलात उतरतात ही गोष्ट शास्त्रसिद्ध आहे मुलाचा तोडवळा, त्याच्या डोळ्याचा रग, चालण्याबोलण्याची ढव वगैरे अनेक गोष्टीत त्याचे आईशी व बापाशी साम्य असते असा अनुभव आहे आईबापाच्या देहामध्ये मूलत जे विशेष असतील ते पुष्कळदा सततीत उतरतात हे खरे आहे पण जे देहविषयक गुण आईबापाचे मूळचे नाहीत, जे त्यानी प्रयत्नत सपादिलेले आहेत, ते उतरतात की नाही या प्रश्ना-सबधाने शास्त्रज्ञाचे उत्तर एकदरीत नास्तिपक्षी आहे पूर्वी चिनी लोक बायकाची पावले बाधून बारीक करीत, आज हिंदु लोक कानास भोक पाडतात, या रूढि पिढ्यानुपिढ्या चालू आहेत पण इतक्या पिढ्या केलेली ही गोष्ट सततीत उतरत नाही. मुसलमान मुलाच्या मानाने हिंदु मुलाच्या कानाची पाळी पातळ आहे, तेथे छिद्राचा किंचित् तरी मागमूस आहे असा बिलकुल अनुभव नाही पुष्कळ लोक सबध डोक्याची गुळगुळीत

हजामत पिढ्यानुपिढ्या करीत असत पण त्यांच्या संततीच्या डोक्यावरील केस कमी झाल्याचा अनुभव नाही ही व अशी अनेक उदाहरणे पाहून व प्रयोग करून शास्त्रज्ञांनी असे (निदान आज तरी) ठरविलेले आहे की देहामध्ये काही नवीन गुण प्रयत्नत आणले तरी ते संततीत उतरत नाहीत.[1] ही देहाच्या गुणाची गोष्ट झाली मनाच्या गुणांविषयीही प्राणिशास्त्रज्ञाचे मत तसेच आहे

आईबापानी एकादा गुण मुद्दाम संपादन केला असला तर तो संततीत उतरल्याचे दृष्टोत्पत्तीस येत नाही सर्व मुले अगदी लहाणपणी लोकाचे ऐकून प्रयत्नाने बोलावयास शिकतात माणसाच्या अशा अनंत पिढ्या झाल्या असल्या तरी स्वभावत:च आपोआप बोलणारे मूल अद्यापि पृथ्वीवर जन्मलेले नाही लहानपणी मुले प्रयत्नाने लेखनकला शिकतात पण न शिकता स्वभावत:च लिहू शकणारी मुले उत्तरोत्तर जास्त प्रमाणात जन्मल्याचा अनुभव नाही वागण्याच्या गोष्टींचाही तोच प्रकार आहे बुद्धिमत्ता, नीतिमत्ता हे गुणही संततीत उतरल्याचे नियमाने आढळत नाही पुष्कळ बुद्धिमान् माणसाची मुले ढ निपजतात व पुष्कळ ढ आईबापांची मुले जात्याच हुषार असतात, असा अनुभव आहे ढ आईबापाच्या मुलास प्राय. शिक्षण मिळत नाही व बुद्धिमान् आईबाप आपल्या मुलांना शिकविण्याचा नेटाचा प्रयत्न करतात आणि म्हणूनच वरवर पहाणाऱ्या जिज्ञासूच्या मनात ही गोष्ट भरत

१ आईबापाच्या देहाचे नैसर्गिक गुण संततीत लगेच अथवा काही पिढ्यानंतर उतरतात हे खरे आहे आईबाप नैसर्गिक कारणाने मुके अथवा आंधळे असले तर त्यांच्या संतानात किंवा नातवंडात मुकेपणा अथवा आंधळेपणा हे गुण उतरलेले आढळतात पण जर धंद्यावर अथवा डोळ्यावर फटका लागून माणूस आंधळा वा मुका झाला असेल तर ही देहगुणे मूळची नसल्यामुळे पुढच्या पिढीत उतरत नाहीत असे शास्त्रज्ञाचे म्हणणे आहे (मागे पृ. १८ व [illegible], आणि टीप ही पहा)

नाही पण जात्याच आईबापाची बुद्धिमत्ता संततीत उतरल्याचा अनुभव नाही नीतिविषक गुणासंबधी तीच स्थिति आहे पुष्कळ आईबापाच्या पोटी त्याना खाली माना घालावयास लावतील अशी मुले जन्मतात, हे आपण वारवार पहातो

स्वाभाविक गुणांसंबंधाने ही गोष्ट झाली, पण जे नीतिविषयक अथवा बुद्धिविषक गुण माणमाने प्रयत्नत: संपादन केले असतील ते संततीत उतरण्याचा संभव त्याच्याहूनही कमी आहे. एकाद्या माणसाने अभ्यास करून आपली बुद्धि कुशाग्र केली किंवा सद्गुण आणण्याची खटपट करून आपला स्वभाव सुधारला तर ते गुण संततीत उतरण्याचा संभव फारसा नसावा हे स्पष्ट आहे जर स्वभावात पूर्वीच असलेले मनाचे गुण संततीत उतरण्याची मुष्कील, तर प्रयत्नाने मिळविलेले गुण उतरण्याची अडचण त्याहून काकणभर अधिक असावी हे सरळच आहे एकाच आईबापाच्या दोन मुलात बुद्धिमत्तेचे व स्वभावाचे पुष्कळच फरक दिसून येतात हा आपला नित्याचा अनुभव आहे त्यावरून पहाता आईबापाचे मनोबुद्धीविषयक गुण नियमाने संततीत उतरतात हे म्हणणे टिकण्यासारखे नाही

## शास्त्रीय अडचणी

जर एका पिढीने स्वतःची शरीरयष्टि निरोगी व सुदृढ केली, बुद्धिमत्ता व नीतिमत्ता यातही सुधारणा केली आणि हे गुण जर नियमाने संततीत न उतरले, तर पिढ्यान्‌पिढ्या आनुवंशिक संस्कार सारखे उतरत जाऊन मनुष्य जातीची प्रगति होत होत ती आदर्श स्थितीस जाऊन पोहोचेल ही आशा केवळ फोल आहे आणखी काही गोष्टींना विचार केल्यास मनुष्य जातीची प्रगति या रीतीने व्हावी असा सृष्टीतला क्रम दिसत नाही. कनिष्ट प्रतीच्या माणसात संतति फार होते व जसजशी उच्च माणसाकडे दृष्टि द्यावी तसतसे संततीचे प्रमाण कमी असल्याचे आढळून येते. तेव्हा आईबापाचे गुण संततीत उतरतात असे जरी आपण

क्षणभर मानले तरी कनिष्ठ लोकाची सख्या उत्तरोत्तर जास्त प्रमाणात वाढून समाजाची प्रगति होण्याच्या ऐवजी पुच्छ प्रगति होण्याचाच सभव उत्पन्न होईल जी माणसे अलौकिक बुद्धीची व प्रतिभावान् असतात त्यामध्ये लग्न करण्याचे प्रमाण इतर लोकापेक्षा कमी असते, आणि जरी त्यानी लग्न केले तरी असली माणसे निपुत्रिक होण्याचाच सभव अधिक असतो प्रतिभावान् माणसाचा विशेष विचार लॉब्रोसो या शास्त्रज्ञाने केला आहे. "पुष्कळ प्रतिभावान् माणसे निपुत्रिक असतात" असे त्याने लिहिले आहे [1] इग्लडमधील विशेष बुद्धिमान् माणसाच्या चरित्राचा सर हॅवलॉक एलिस यानी शास्त्रीय रीतीने अभ्यास केलेला आहे त्यानी सुमारे एक हजार प्रखर बुद्धीच्या स्त्रीपुरुषाविषयी माहिती मिळवून त्याचे विवाह, त्याची सतति इत्यादिकाविषयी आकडे प्रसिद्ध केले आहेत त्या आकड्यावरून त्यांनी असे अनुमान काढले आहे की बुद्धिमान् स्त्रीपुरुषामध्ये सामान्य जनतेपेक्षा जास्त लोक अविवाहित राहतात, व जे विवाह करतात त्यामध्ये निपुत्रिकाचे प्रमाण फारच अधिक आढळते [2] दुसरे असे की, स्त्रीपुरुषाची मने सुसस्कृत व प्रगल्भ जी होतात ती त्याच्या उतारवयात होतात. जगात टक्केटोणपे खाऊन, अनेक पावसाळे पाहून

---

१ The Man of Genius या पुस्तकात पृष्ठ १३ वर लॉंब्रोसो यानी Many men of genius have no children असें म्हटले आहे

२ A Study of British Genius या Havelock Ellis याच्या पुस्तकात त्यानी (पृ १६४ वर) पुढील उद्गार काढले आहेत : The number of sterile persons (like the number of unmarried persons) among our eminent men and women must be regarded in all probability as an abnormally large proportion in comparison with the general population of the same period and class (पृ १६४) मात्र ज्या बुद्धिमान् व्यक्तीस मुले होतात त्याच्या मुलाची सख्या त्या श्रेणीच्या इतर लोकापेक्षा फारशी कमी असते असा मात्र त्याचा अनुभव नाही.

आणि पुष्कळ अभ्यास करून मगच माणूस शहाणा, विचारी, आणि नीतिमान् होत असतो इतकी योग्यता त्याला त्याच्या उतारवयात म्हणजे सुमारे पचेचाळीस वर्षाच्या पुढेच येऊ शकेल पण या वयात स्त्रियाना मुले होण्याचे बद होऊ लागते स्त्री-पुरुषाना ऐन तारुण्यातच प्राय मुले होतात व त्या काळी ते स्त्रीपुरुष गद्धेपचविशीत असण्याचा सभव अधिक असतो ! जेव्हा आईबाप असस्कृत व अप्रगल्भ असतात तेव्हा त्याना सतति व्हावी, व ते शहाणे होऊ लागले की सतति होण्याचे बद व्हावे, यावरून पहाता जरी आईबापानी सपादन केलेले गुण सततीत उतरत असले तरी त्याचा मानवी प्रगतीला फारसा उपयोग होणार नाही हे उघड आहे कमी योग्यतेच्या माणसाना कनिष्ठ दर्जाची भाराभर मुले होतील, अलौकिक बुद्धीच्या व्यक्तीना होणार नाहीत, व सामान्यत सर्व प्रकारच्या माणसाना त्याच्या अगात चागल-पणा बाणण्याच्या अगोदर— म्हणजे ती अप्रौढ, अज्ञ, व मोहवश असताना मुले होतील या दिशेने मानवी प्रगतीला फारसा वाव आहे असे वाचकहो, तुम्हाला वाटते काय ?

आईबाप मुलाला देह देतात व देहापुरते मुलाचे वैशिष्टय आईबापापासून आलेले असते मुलाचे मन, त्याच्या वृत्ति, त्याच्या बुद्धीचे गुणावगुण हे त्या मुलाचा जीव मागल्या जन्मातून बरोबर आणतो आईबापापासून आणलेल्या गोष्टी आणि जीवाच्या स्वत च्या गोष्टी याचे मीलन मुलाच्या नवीन देहात होते हे लक्षात आणिले तर एका पिढीतले सस्कार दुसऱ्या पिढीत कितपत उतरतील या भानगडीच्या प्रश्नावर काहीसा प्रकाश पडेलसे वाटते

## पुनर्जन्म व आनुवशिक सस्कार

पुनर्जन्म मानणे म्हणजे आनुवशिक सस्काराचा इन्कार करावयाला पाहिजे असे मात्र नाही पुनर्जन्म मानणे म्हणजे जीव एक देह सोडून दुसऱ्या देहात येऊ शकतो व तसा येताना आपला अनुभव आपले गुणदोष, आपले वैशिष्टय ही बरोबर

ऊन येतो इतकेच कबूल करणे होय पण हा नवीन देह ज्या ाईबापानी दिलेला असतो त्याची छाया त्या देहावर पडणार ाही, त्याचा तोडवळा त्याच्यासारखा असणार नाही असा त्याचा र्थ नाही. देहापुरते मातापित्याचे आनुवशिक सस्कार मान्य रणे व अतरगाबाबत जीवाने बरोबर आणलेले पूर्वसस्कार मान्य रणे यात कोणत्याही प्रकारचा विरोध नाही. पुनर्जन्मवादाला या ोन्ही गोष्टी मान्य आहेत. पण या दोन्ही गोष्टी मान्य असल्या री त्यापैकी कोणतीही एक गोष्ट सपूर्णपणे सर्व प्रश्नाचा उलगडा रू शकणार नाही असे पुनर्जन्मवादाचे नेहमीच म्हणणे असते

जे लोक पुनर्जन्म मानीत नाहीत ते परिस्थिति व आनुव-शिक सस्कार या दोन गोष्टीवरून सर्व प्रश्नाचा उलगडा करू हात असतात तसे होणे शक्य आहे की नाही याचा विचार ापणाम येथे करणे जरूर आहे

एक माणूस रानटी असावा व दुसरा उच्च दर्जाचा असावा, जे उत्क्रान्तिमूलक फरक आपणास दिसून येतात त्या सर्वांचा ानुवशिक सस्काराच्या उपपत्तीने निकाल लावता येईल असे केत्येकास वाटते पण वस्तुस्थिति तशी नाही मातापित्याचे वसपादित सस्कार सततीत उतरत नाहीत हे शास्त्रज्ञाचे म्हणणे ाम्ही वर दिले आहेच. पण. जरी असले सस्कार वरच्या पिढी-न खालच्या पिढीत येतील असे मान्य केले, तरी अनेक कूट-प्रश्न सेच रहातात बुद्धाचे आईबाप व दुसरे पूर्वज कितीही चागले सले तरी बुद्ध त्याच्यापेक्षा अनेक पटीनी थोर होता हे उघड ाहे जो थोरपणा त्याच्या पूर्वजात नव्हता तो त्या पूर्वजापासून ुलाने घेतला असे म्हणणे म्हणजे विहिरीत पाणी नसताना ते ोहऱ्यात येऊ शकेल असे म्हणण्यासारखे आहे पुष्कळ मुलात से गुण दिसतात की जे त्याच्या आईबापात किवा, त्याच्या ागोदरच्या पूर्वजात नव्हते फिलिप व अलेक्झँडर, लॉर्ड चाथाम धाकटा पिट, बाणभट्ट व त्याचा पुत्र, नेहरू पितापुत्र, मुकर्जी पेतापुत्र, चिपळूणकर पितापुत्र अशा जोड्या इतक्या थोड्या

आहेत की अलौकिक मुलाचे तेज त्याच्या आईबापापासून त्याने आणिलेले असते, असे फारसे म्हणता येणार नाही जर आनुवशिक सस्कारांनीं अलौकिक प्रतिभा उत्पन्न होत असेल तर जेथे जेथे ते आनुवशिक सस्कार आहेत तेथे तेथे ती प्रकट व्हावयास पाहिजे नेपोलियनचे साहस जर त्याच्या आईबापापासून आले असेल तर त्याला सात सख्खी भावडे होती त्या सर्वांमध्ये ते सापडावयास पाहिजे होते ते का सापडत नाही ? अलौकिक माणसे सामान्य प्रतीच्या आईबापाच्या पोटी उत्पन्न होतात व त्याच आईबापाच्या पोटी आलेल्या दुसऱ्या मुलाच्या अगी ते अलौकिकत्व नसते असा अनुभव आहे तसेच अलौकिक माणसाच्या पोटची मुले सामान्य प्रतीची असतात, इतकेच नव्हे तर कधी कधी अगदी गचाळही असल्याचे दिसून येते अलौकिक प्रतिभेला आगापिछा काही दिसत नाही, तुटलेल्या ताऱ्याप्रमाणे ती काळोख्या रात्री प्रकट होते आणि किंचित्काळ सर्व प्रदेशात लखलखाट उत्पन्न करून ती त्याच काळोखात निराम पावते त्या काळोखाने ती तारका उत्पन्न केली असे म्हणावयाचे असेल तर ती एकादे वेळेसच का उत्पन्न होते असा प्रश्न उद्भवेल रात्री काळोख चारी प्रहर असतो जर काळोखाला तारका निर्माण करता येत असेल तर तो त्यासाठी मुहूर्ताची वाट कशास पाहील ? जर आनुवशिक सस्कारामुळे प्रतिभावान् माणसे जन्मास येती तर जगावर काही काळी प्रतिभावान् माणसाचा दुष्काळ व काही काळी त्याचा सुकाळ असे होण्याचे कारण नव्हते त्याचप्रमाणे प्रतिभावान् माणसे जगाच्या इतिहासात अगदी थोडी सापडण्याचेही कारण नव्हते

## परिस्थितीचा प्रश्न

परिस्थितीचा प्रश्नही अशाच प्रकारचा आहे परिस्थितीचा माणसावर परिणाम होत नाही असे पुनर्जन्मवादी लोक म्हणत नाहीत आनुवशिक सस्काराचे महत्त्व ते जसें ओळखतात तसें ते परिस्थितीचेही ओळखतात. मात्र परिस्थितीचा मुद्दा मान्य

केल्याने सर्व प्रश्न सुटतील व मग पुनर्जन्माचा सिद्धान्त मानण्याचें कारण नाही हे त्यास कबूल नाही परिस्थिति काय किंवा आनुवंशिक संस्कार काय, काही अडचणीचा अगत उलगडा त्याचेपासून होऊ शकेल पण जोवर सर्व प्रश्नाचा पूर्ण उलगडा त्या गोष्टीच्या जोरावर होत नाही, तोवर पुनर्जन्म मानणे आवश्यक होते इतकेच नव्हे तर एकदा पुनर्जन्माचा सिद्धान्त मान्य केला आणि तो नीटपणे समजून घेतला म्हणजे आनुवंशिक संस्कार व परिस्थिति या दोन्ही गोष्टीचे योग्य स्थान कोणते व त्यास किती महत्त्व दिले पाहिजे हेही माणसाच्या लक्षात येते. माणसाच्या मनावर, त्याच्या गुणावगुणावर, त्याच्या कार्यक्षमतेवर परिस्थितीचा परिणाम पुष्कळच होतो ही गोष्ट इतकी उघड आहे का ती जे नाकबूल करतील त्याना आंधळे म्हणण्यास आम्हास बिलकुल हरकत वाटत नाही एकाद्या मुलाचे आईबाप प्रेमळ, सुशिक्षित व नीतिमान् असले, त्याच्यापाशी पैसे मुबलक असले, मुलाचे संगोपन कसे करावे, देहाला सशक्त कसे बनवावे हे त्यास समजत असले, मुलाच्या मनामध्ये जिज्ञासा उत्पन्न करून ज्ञानाविषयी कसे प्रेम उत्पन्न करावे याची त्याना कल्पना असली, तर तो मुलगा चागल्या परिस्थितीत आहे असें म्हणावे लागेल असले आईबाप त्या लहान मुलाला कुसंगति लागू देणार नाहीत, त्याला खाण्यापिण्याच्या, तसेच व्यायाम-अभ्यासाच्या उत्तम सवयी लावतील, ज्ञानाची आवड त्याच्या अंगी उत्पन्न करितील, उत्तम उत्तम चरित्रे त्यास वाचावयास देऊन थोरपणाची महत्त्वाकांक्षा त्याच्या हृदयात जागृत करितील, जनसेवा, नीतिमत्ता, स्वार्थत्याग, वगैरेविषयीची ध्येये त्याच्यासमोर ठेवतील. मुबलक पैसा खर्चून उत्तम अन्न, उत्तम खेळ, उत्तम पुस्तके, उत्तम शिक्षकही त्याला देतील, उत्तम शिक्षणसंस्थात त्याचा प्रवेश करवितील, अशा तऱ्हेने उत्कृष्ट परिस्थितीत त्याला ठेवून त्याची योग्य दिशेने वाढ करितील. उलट पक्षी जर मुलाची परिस्थिति प्रतिकूल असली, आईबाप जिवंत नसले, किंवा जिवंत असूनही अज्ञानी वा व्यसनी असले, घरात अठराविश्वे दारिद्र्य

असले, तर त्या मुलाची स्थिति अगदी वेगळी होईल. कधी त्याला पोटभर अन्न मिळेल, कधी मिळणार नाही, अशी त्याच्या देहाची अबाळ होईल. वाईट मुलाची सगति लागून तो कदाचित् कुमार्गास लागेल. खाण्यासच पैसे पुरेसे नाहीत, तर उत्तम शिक्षकांच्या हाताखाली शिकणे, मर्दानी खेळ खेळून शरीर सुदृढ करणे या गोष्टी कशा व्हाव्या ? ज्ञानाची व लोकसेवेची आवड धरणे, उत्कृष्ट शिक्षण मिळविणे, थोर थोर महत्त्वाकाक्षा मनात बाळगणे या गोष्टीसाठी जरूर असणारी सगति व साधने मिळणे त्याला बिकट होईल पहिल्या प्रकारच्या परिस्थितीत त्याची जीवनकलिका उत्तम रीतीने फुलून ती आपला मधुर सुवास सर्वत्र पसरील. दुसऱ्या प्रकारच्या परिस्थितीत त्याची कळी नीट फुलणार नाही, बरीचशी सुकून-कोमेजून जाईल, तिच्याकडे कोणासही बघावेसे वाटणार नाही व तिचा सुवासही कोणाला येणार नाही परिस्थितीने त्या दोन मुलात इतका मोठा फरक होईल हे उघड आहे परिस्थितीमुळे अशा प्रकारचे फरक होतात हे आपण वारवार पहातोच

यावरून सर्वच गोष्टी परिस्थितीवर अवलबून असतात, किवा एक माणूस अगदी अप्रबुद्ध असावा व दुसरा न्यूटनसारखा ज्ञानी किवा शिवाजीसारखा पराक्रमी असावा, हे माणसामाणसामधील फरक सर्वस्वी परिस्थितीमुळे उत्पन्न होतात असे मात्र म्हणता येणार नाही जर सर्वच गोष्टी परिस्थितीवर अवलबून असल्या तर माणूस हा निर्जीव दगड आहे असे मानावे लागेल. एकाच परिस्थितीत शभर निर्जीव पाषाण ठेवले तर त्यावर त्या परिस्थितीचा सारखाच परिणाम होईल पाषाणापेक्षा वृक्षवेली व वनस्पति यामध्ये जिवतपणाची धुगधुगी अधिक आहे त्यास एकाच परिस्थितीत ठेवले तर सर्वांवर एकदरीत सारखा परिणाम होईल, पण त्यात किंचित्सा फरकही दिसून येईल शभर झाडे असली आणि त्या सर्वानाच एकाद्या वर्षी अवर्षणामुळे फार कमी पाणी मिळाले तर त्या दुष्काळाचा त्यांच्यावर तंतोतत एकच परिणाम होईल

असे नाही बरीच झाडे मुकून मरतील. पण जी थोडीशी जोमदार असतील ती त्या दुष्काळातही कसाबसा प्राण धरून राहतील वनस्पतिकोटीपेक्षा प्राणिकोटीत जीवाची अभिव्यक्ति जास्त असते अनेक प्राणी एकाच परिस्थितीत ठेवले तर वनस्पतीपेक्षा प्राण्यामध्ये थोडा जास्त फेर दिसून येईल एकादी साथ आली तर काही प्राणी मरतील, पण काही जगतील त्या प्राण्यावर शत्रूने हल्ला केला तर काही पळतील, पण काही त्याला विरोध करतील

मनुष्यकोटी म्हणजे प्राणि-कोटीच्या वरची कोटी त्यातली शभर माणसे सारख्याच परिस्थितीत ठेवली तर प्राणिकोटीहून त्याच्यामध्ये जास्त फेर दिसून येईल परिस्थितीचा माणसावर जरी पुष्कळ परिणाम होत असला तरी सारख्या परिस्थितीतही माणसामाणसामध्ये प्राण्यापेक्षा जास्त भिन्नपणा आपणास दिसून येतो दोन मुले सारख्याच कगाल स्थितीत असली तर दारिद्र्याचा त्या दोघावर फार मोठा परिणाम होईल हे खरे, पण तो परिणाम दोघावर सारखाच होईल असे नाही कदाचित् एक माणूस त्या कगाल स्थितीतून डोके वर काढील व त्या परिस्थितीच्या वरवटचाखाली कदाचित् दुसऱ्याची अगदी दामटी वळून जाईल चागल्या परिस्थितीचाही त्या दोघावर ततोतत एकसारखाच परिणाम होईल असे नाही व्यक्तीमध्ये जीवाचा केंद्र जितका जोरदार असेल त्या मानाने तो अनुकूल परिस्थितीचा जास्त फायदा घेऊ शकतो व प्रतिकूल परिस्थितीला तो जास्त नमवतो दारूच्या गुत्त्याशेजारी शभर माणसे रहात असली तर त्यातील नव्याण्णव माणसे दारूबाज बनण्याचा जसा सभव आहे, तसा त्यातला एक माणूस दारूच्या मोहावर मात करण्याचाही सभव आहे दारूचा गुत्ता मोह उत्पन्न करतो व माणसाचे मन त्या मोहाचा प्रतिकार करते, आणि कधी कधी त्या मोहावर विजयही मिळविते परिस्थिति माणसावर परिणाम घडवीत असते, व माणूसही यथाशक्ति त्या परिस्थितीवर प्रत्याघात करीत असतो. जर तो माणूस निश्चयी,

बुद्धिमान् व चिकाटी धरणारा असला, तर तो परिस्थितीवर जास्त जोराचा आघात करील. जर तो भित्रा, निर्बल व पर-प्रत्ययनेय असेल तर त्याचे आघात अगदी मिळमिळीत होतील, आणि परिस्थिति नेईल त्या दिशेने तो वाहात जाईल

जगातील लहानमोठ्या लोकाची चरित्रे पाहिली तर हे उघड होईल कगाल, आळशी, अज्ञ व व्यसनी लोकास परिस्थिति चटकन नमविते सुशिक्षित, नीतिमान्, उद्योगी व निश्चयी माण-साला ती तितक्या लीलेने नमवीत नाही, आणि जो माणूस अलौकिक गुणाचा असेल तो उलट परिस्थितीला नमवितो महात्मा गाधी व टिळक याना ब्रिटिश सरकारने अनेकवेळा तुरुगात घातले व त्यामुळे त्याना फार हाल-अपेष्टा सोसाव्या लागल्या पण ते त्या प्रतिकूल परिस्थितीला नमले नाहीत बेंजामिन फ्रॅंकलिन हा दरिद्री होता पण तो त्या दारिद्र्याशी सारखा झगडून जगा-मध्ये एक सुप्रसिद्ध पुरुष म्हणून पुढे आला ज्ञानेश्वराची परि-स्थितीही प्रतिकूलच होती लहानपणी आईबाप मरावे, पैसा जवळ नसल्यामुळे चरितार्थासाठी भिक्षा मागण्याची पाळी यावी. आणि लोकाचा सामाजिक बहिष्कार पडावा ही काही चागली परिस्थिति नव्हे पण ज्ञानेश्वरानी त्या परिस्थितीवर मात केली गौतम बुद्धाचीही परिस्थिति फार प्रतिकूल होती व्यसनाचा मोह पाडणारी अलोट सपत्ति, दुरभिमान शिकविणारी अनियत्रित सत्ता, ससार–पाशात गुतविणारी सुस्वरूप बायको, आणि अलौकिक महत्त्वाकाक्षेस जागृत करणारे राजाचे सिहासन ही व अशी अनेक विघ्ने त्याच्यासमोर होती असल्या अडचणीतून फारच थोड्या माणसाना विरक्तीची, जनसेवेची व सत्यशोधनाची वाट सापड-लेली आहे

यावरून उघड होईल की, परिस्थितीचा माणसावर मोठा परिणाम होत असला तरी परिस्थिति सर्व गोष्टीचा उलगडा करू शकत नाही. माणसामाणसाच्या विकासामध्ये जो फरक दिसतो त्याचे परिस्थिति हे अशत कारण असू शकेल नागऱ्या जर

लोकमान्य टिळकाना म्हणू लागला की परिस्थिति प्रतिकूल असल्यामुळे मी नागऱ्या झालो व ती अनुकूल असल्यामुळे तुम्ही लोकमान्य झाला, तर हे त्याचे म्हणणे अशत खरे आहे असे कबूल करणे भाग आहे संस्कृत शिकलेले वडील, निर्व्यसनी व प्रेमळ आई, शाळा-कॉलेजचे शिक्षण, वगैरे कित्येक गोष्टी त्या नागऱ्याला मिळालेल्या नव्हत्या, व टिळक व नागऱ्या या दोघामध्ये ज्या कारणामुळे अतर पडले आहे त्यामध्ये त्याचा समावेश करणे अवश्य आहे पण संस्कृतज्ञ वडील, निर्व्यसनी व प्रेमळ आई, शाळा कॉलेजचे शिक्षण वगैरे गोष्टी जरी त्या नागऱ्याच्या वाट्यास आल्या नसल्या तरी महाराष्ट्रातल्या इतर शेकडो लोकाच्या वाट्यास आल्या आहेत, व त्यापैकी एकही माणूस लोकमान्य टिळक झालेला नाही हे त्या नागऱ्याला दाखवून देणे अवश्य आहे निराळ्या शब्दानी हेच सागावयाचे झाल्यास असे म्हणता येईल की नागऱ्या व टिळक यामध्ये असणारे सारेच अतर परिस्थितिजन्य नाही टिळकाच्या सारख्या परिस्थितीत असणारे जे वर सागितलेले शकडो लोक, ते आणि नागऱ्या यामधले अतर परिस्थितिजन्य आहे पण ते लोक आणि लोकमान्य यामधील अतर परिस्थितिजन्य नसून पराक्रमजन्य मानले पाहिजे त्या पराक्रमाचा उलगडा करावयाचा झाला तर पूर्वजन्माचा सिद्धान्त मान्य करणे अवश्य आहे

## प्रकरण ५ वें

# पूर्वजन्मांची आठवण

येथपर्यंत आपण पुनर्जन्माविषयीच्या साधक बाधक प्रमाणाचा विचार केला व तो तर्कशास्त्राच्या जोरावर केला आणि पुनर्जन्माचा सिद्धान्त खरा मानणे सयुक्तिक आहे असे अनुमान काढून ते वाचकासमोर ठेविले युक्तिवादाच्या दृष्टीने याविषयासबधाने येथवर विवेचन झाले आता तर्कशास्त्राची भवति न भवति सोडून देऊन या व पुढील प्रकरणात पुनर्जन्माच्या सिद्धान्ताविषयी अनुभवात्मक व प्रयोगात्मक पुरावा कोणता आहे तें आपणास पहावयाचे आहे हल्लीचे युग हे सायन्सचे व भौतिकशास्त्राचे युग आहे आणि तर्कशास्त्रापेक्षा प्रयोग आणि अनुभव याची किमत अधिक आहे, ही गोष्ट आज जगाच्या ध्यानात आलेली आहे तर्कशास्त्रातील वकिलीच्या जोरावर कधी कधी खोटे सिद्धान्त खरे असल्याचा भास उत्पन्न करता येतो आणि आज खरे वाटणारे सिद्धान्त उद्या खोटे ठरण्याचा सभवही उत्पन्न होतो अनुभव व प्रयोग याची गोष्ट वेगळी असते त्यानी दिलेली साक्ष आज एका बाजूची व उद्या दुसऱ्या बाजूची असे होऊ शकत नाही आणि म्हणूनच त्या साक्षीला महत्त्व असते

पुनर्जन्माविषयीचा अनुभव म्हणजे पूर्वी आपण जन्मलो होतो ही आठवण होय अशी आठवण जर एकाद्याला सहजासहजी झाली किवा ती आठवण जर त्याच्या मनात प्रयत्नत उत्पन्न करता आली, तसेच ती आठवण म्हणजे नुसती कविकल्पना नसून ती खरी असल्याचा जर पडताळा सापडला, तर पुनर्जन्माचें

ते अत्यंत निर्णायक प्रमाण होईल हे उघड आहे अशा तऱ्हेचे अनुभव उपलब्ध आहेत, त्याचा विचार या व पुढच्या दोन तीन प्रकरणात आम्ही करण्याचे योजिले आहे

## माणसाच्या आठवणीचें स्वरूप

पूर्वजन्माविषयीच्या आठवणीचे विवेचन करण्यापूर्वी माणसाच्या स्मृतीचे सामान्य स्वरूप कसे असते, याचा जर आपण प्रथम विचार केला, तर हा विषय समजण्यास सुलभ होईल कोणतीही गोष्ट नुकतीच झालेली असली तर तिची आपली आठवण ताजी व धगधगीत असते, पण पुढे कालगत्या ती अधुक होऊ लागते आणि पुष्कळ वर्षे गेल्यावर ती अजीबात बुजून जाते, ही गोष्ट सर्वांच्या अनुभवाची आहे एखाद्या गोष्टीकडे आपले विशेष लक्ष असले, त्या गोष्टीविषयी आपल्याला फार अगत्य वाटत असले, तर तिची आठवण जास्त स्पष्ट असते आणि ती अधिक कालपर्यंत टिकते. पण ज्या गोष्टीचे आपल्यास महत्त्व वाटत नाही, ज्या गोष्टीकडे मन ओढ घेत नाही किंवा मनाला जिचा द्वेषमूलक तिरस्कारही वाटत नाही, ती गोष्ट अगदी अलीकडची असली तरी आपल्या स्मृतिपटलावर तिचा जोराचा ठसा उमटलेला नसतो व जो उमटला असेल तो लवकरच बुजून जातो याही गोष्टी सर्वांच्या परिचयाच्याच आहेत तथापि हा विषय नीट समजण्यासाठी आपणास अशाही काही गोष्टी येथे जमेस धराव्या लागतील की ज्या सर्वांना चांगल्या माहीत नाहीत माणसाचे मन एका स्थितीत असले म्हणजे दुसऱ्या स्थितीतील आठवण त्याला प्राय नसते ही गोष्ट या बाबतीत महत्त्वाची आहे माणसाला झोप लागली असताना तो कधी कधी बडबडतो व त्याला स्वप्ने पडतात, पण त्या गोष्टीची चांगलीशी आठवण माणसाला जागे झाल्यावर येत नाही सकाळी झोपेतून उठता क्षणीच आपणाला काही स्वप्नाची आठवण असते, पण थोडासा वेळ गेला म्हणजे ती नाहीशी होते, असा अनेकांना अनुभव आहे कधी कधी माणसाला एखादे स्वप्न बिलकुल आठवत नाही,

पण त्या स्वप्नाशी संबध असणारी एकादी वस्तु, किवा एकादी जागा किवा एकादे माणूस दुसऱ्या दिवशी महज दृष्टीस पडले, तर एकदम मनात लख्खकन् प्रकाश पडून त्या स्वप्नाची सबध आठवण माणसाला येते यावरून दिसते की, एका अवस्थेची आठवण दुसरीत आणण माणसाला कठिण जाते मेस्मेरिझम् ही एक प्रकारची कृत्रिम निद्रेसारखी अवस्था आहे माणसाला जर आपण त्या अवस्थेत मुद्दाम नेले व ती मेस्मेरिझम्ची निद्रा पुरेशी गाढ असली तर त्या स्थितीची आठवण त्याला जागेपणी नसते त्या निद्रेच्या स्थितीत तो चालू बोलू शकतो, डोळे उघडून पाहू शकतो, दुसऱ्याने सागितलेले ऐकू शकतो, पण त्या स्थितीतून त्याला जागृतीत आणले म्हणजे त्या स्थितीतल्या क्रिया त्याला आठवेनाशा होतात त्या माणसाला पुन मेस्मेरिझम्च्या स्थितीत घातले तर पूर्वीच्या मेस्मेरिझम्च्या स्थितीत झालेल्या ज्या गोष्टी त्याला जागेपणी आठवत नव्हत्या त्या पुन आठवू लागतात यावरून असे दिसते की, जागृत स्थितीतील स्मृति सूत्र जसे अखड असते तसे मेस्मेरिक स्थितीतील स्मृतिसूत्रही अखड असते. पण ही दोन्ही वेगवेगळी असतात समजा, एक हातरुमाल दुहेरी घडी करून हातावर धरला आणि त्याच्या वरच्या घडीवर एक मुगी ठेवली आणि खालच्या घडीवर दुसरी मुगी ठेवली तर ह्या दोन्ही घड्यावरच्या मुग्या आपापल्या घडीवरचे आपले व्यवहार स्वतत्रपणे करू शकतील दोघाचे त व्यवहार एकदम होऊ शकतील, पण एका मुगीला दुसरीच्या व्यवहाराचे ज्ञान येऊ शकणार नाही माणसाच्या मनाच्या अशा दोन (किवा कदाचित् दोहोहून अधिक) घड्या किवा थर असतात, व प्रत्येक घडीवरील किवा थरावरील मुगीरूपी स्मृति स्वतत्र असते, व एकीला दुसरीची कल्पना होत नाही समजा, एका माणसाला मेस्मेरिझम्च्या निद्रेत घातले आणि त्याला सागितले की, अमुक एक गृहस्थ चवथ्यादा जेव्हा खोकतील तेव्हा तू ह्या खोलीची खिडकी बद कर समजा, हे सागून त्याला जागे केले तर त्याला ही गोष्ट आठवणार नाही तो दुसरा

गृहस्थ मधून मधून मुद्दाम खोकू लागला व त्याची चवथ्यादाची खोकण्याची पाळी पधरा मिनिटानी आली, तर त्या खोकण्याच्या वेळी तो माणूस खोलीची खिडकी बद करतो असा अनुभव आहे ह्या पधरा मिनिटाच्या अवधीत बोलणे, चालणे, लिहिणे वगैरे नाना गोष्टी जरी तो स्वत करीत असला तरी चवथ्यादाच्या खोकण्याच्या वेळी ते उद्योग टाकून तो बिनचूक खिडकी बद करील या पधरा मिनिटात तो जे उद्योग करीत असेल त्याची स्मृति त्याला नीटपणे राहील 'पधरा मिनिटे तू आपले अमुक अमुक उद्योग नीटपणे करीत होतास, ते सोडून तू खिडकी उगी-चच्या उगीच कां बद केलीस ?' असे त्याला कोणी विचारले तर त्याचे उत्तर त्याला सागता येणार नाही कारण मेस्मेरिझम्च्या निद्रेतील आज्ञेची त्याला आठवण असत नाही या उदाहरणा-वरून पाहिल्यास त्या माणसाच्या जागृत स्थितीचा थर ( किवा घडी ) वर आहे व त्या थरावरील मनाचे उद्योग नीट चालू आहेत हे आपणास दिसून येईल चवथ्यादा खोकल्यानतर माणसाने खिडकी बद केली यावरून पधराव्या मिनिटाच्या वेळी खालच्या थरातील स्मृति एकदम वर येऊन कार्य करीत होती हेही आपणास समजून येईल या पधरा मिनिटाच्या अवधीत तो तिऱ्हाईत माणूस मधून मधून तीनदा जेव्हा खोकला असेल त्या वेळी त्या माणसाच्या जागृत मनाच्या थराचे लक्ष त्याच्याकडे नव्हते हेही चवकशी अती आपणास कळण्याजोगे आहे

समजा, तो तिऱ्हाईत गृहस्थ दोनदा खोकल्यावर आपण त्याला विचारले की हे गृहस्थ कितीदा खोकले ? तर त्याला त्याचे उत्तर देता येणार नाही. माझे त्याकडे लक्ष नव्हते असे तो म्हणेल तुम्ही मला ह्या गृहस्थाच्या खोकल्याविषयी का विचा-रता असा तो आश्चर्ययुक्त मुद्रेने तुम्हाला प्रश्नही कदाचित् करील कारण त्याला मेस्मेरिझम्च्या निद्रेत जे सागण्यात आले आहे, त्याची बिलकुल आठवण नाही, पण तो गृहस्थ दोनदां खोकल्या-नतर तुम्ही त्याला पुन. मेस्मेरिझम्च्या निद्रेत घालून विचारलेत,

नर तो मागेल की ते गृहस्थ दोनदाच खोकले, आणखी दोनदा ते जेव्हा खोकतील तेव्हा मी खिडकी बद करणार आहे याचा अर्थ असा की आतल्या थरातली जी मुगीरूपी स्मृति आहे, तिचा व्यवहार जरी वरच्या मुगीस जाणवत नमला तरी तो आतून सुयत्र चालू आहे यावरून ठरते की माणसाच्या मनाला अनेक थर असून प्रत्येक थरातील व्यवहार व त्याची स्मृति ही सुरळीतपणे एकाच वेळी सुयत्र चालू असतात पण एकाचा थाग दुसऱ्याम नसतो हिस्टेरिया किवा उन्माद हा रोग माणसाला झाला म्हणजे क्वचित् प्रसगी त्याच्यामध्ये बहुमनस्कता (Multiple Personality) दिसून येते काही दिवसपर्यंत आपण अमुक एक माणूस आहो अशी त्या रोग्याची कल्पना असते, व त्या कल्पनेस अनुरूप असे तो आपले सारे व्यवहार त्या स्थितीत करतो पुढे त्याच्या मनाची जणू आलटापालट होऊन पूर्वीचे मन कोठे तरी नाहीसे होते, व आपण दुसरीच कोणी व्यक्ति आहो असे त्यास वाटू लागते, आपले नाव गाव धदा सारे तो निराळे सागतो आणि आपले सारे उद्योग तो त्या नव्या व्यक्तित्वाच्या धोरणाने बरेच दिवस करू लागतो ह्या दोन्ही स्थिति त्याला आलटूनपालटून येतात पण एका स्थितीत दुसरीची आठवण त्याला असत नाही एका मनाचे राज्य चालू असले म्हणज दुसरे दडून बसते व त्याची आठवण नाहीशी होते दुसऱ्या मनाच राज्य सुरू झाले म्हणजे त्याला पहिल्याची कल्पना नसते मात्र ज्या कोणत्या मनाचे राज्य सुरू असेल त्याला पूर्वी जेव्हा जेव्हा त्याच राज्य सुरू होते त्याची आठवण राहिलेली असते [१]

## पूर्वजन्मीची आठवण

वरील वर्णनावरून माणसाच्या मनाचे थर कसे वेगळे असतात व एकाची माहिती दुसऱ्यास नसल्यामुळे कशा भानगडी

१ प्रस्तुत ग्रथकाराचे मेस्मेरिझम् नावाचे जे पुस्तक आहे, त्यातील मेस्मेरिझम्ची उपपत्ति हे प्रकरण पहा, विशेषत पृ ११७–११८ वरील प्रयोग पहा त्यावरून दिसून येईल की, ही उदाहरणे काल्पनिक नाहीत ती प्रयोगावरून घेतलेली आहेत

उत्पन्न होऊ शकतात यांची थोडी तरी कल्पना आमच्या वाचकांना यावी असे वाटते. पूर्वजन्माची स्मृति म्हणजे जागृतीच्या स्मृतीहून वेगळी असली पाहिजे हे उघड आहे. अर्थात् त्या स्मृतीचा थर कोठे तरी आत असला पाहिजे व त्याची जागृती जागृत स्थितीमध्ये सामान्यतः येण्यासारखी नसणार हे कोणाच्याही ध्यानात येईल. तेव्हा पूर्वजन्माची आठवण असणारा मनुष्य असामान्य प्रकारचा असणे अवश्य आहे. मग तो असामान्यतेचा भाग चांगल्या व इष्ट जातीचा असो अथवा अनिष्ट व हानिकारक असो. सामान्य गोष्टी म्हणजे ज्या बहुजन समाजात नेहमी आढळतात त्या; व असामान्य गोष्टी म्हणजे ज्या क्वचित् आढळतात त्या. ह्या क्वचित् दिसणाऱ्या गोष्टी कधी चांगल्या असतील किंवा कधी वाईट असतील. विचारी माणसाचा चांगल्या गोष्टीचा हट्ट व आग्रह व विक्षिप्त माणसाचा भलता हट्ट व आग्रह हे दोन्ही बरोबर सारखे दिसले तरी एक उन्नति दर्शवितो व दुसरा अवनति दर्शवितो. तद्वत् पूर्वजन्माची आठवण असणे ही गोष्ट उन्नत माणसामध्ये असू शकेल व उन्नति न आलेल्या माणसामध्येही असू शकेल.

मनाच्या एका थरातून दुसऱ्यात जाण्याची कला उन्नत माणसाने स्वप्रयत्नाने साध्य केलेली असेल, व दुसऱ्या एखाद्या माणसाच्या थरावर दुःख, अपमृत्यु, याचे तडाखे बसल्याने, किंवा स्वभावतःच तो थर दुर्बल असल्याने त्या थराला जणू भोक पडून एका थरातले व्यापार दुसऱ्यात सहजासहजीही येत असतील. अर्थात् ज्याना ज्याना असली आठवण होत असेल ते सारे महाज्ञानी व थोर असतील असे मानण्याचे कारण नाही. ज्या उदाहरणात आध्यात्मिक थोरपणाचा प्रश्न येत नाही अशी पूर्वजन्मस्मृतीची उदाहरणे आपण येथे प्रथम विचाराकरिता घेऊ या.[1]

१ माणसाच्या दोन जन्मात सामान्यतः बराच काळ जात असतो. असा पुष्कळ काळ गेला तर मागच्या जन्माची पुढल जन्मात आठवण रहाणे

(टीप पुढील पानावर चालू)

## शांतिदेवी

अशा प्रकारचे पूर्वजन्मीच्या आठवणीचे एक उदाहरण १९३६ साली दिल्ली येथे आढळले होते व त्या वेळी त्याची माहिती वर्तमानपत्रात सर्व देशभर प्रसिद्ध झाली होती, हे आमच्या

---

(टीप मागील पानावरून)

कठिण असते व ती राहिली तरी त्या आठवणीचे प्रत्यतर दाखविणारा फार जुन्या गोष्टीचा पुरावा मिळणेही मुष्किलीचे होते अर्थात् असली उदाहरणे पुराव्याच्या दृष्टीने निरुपयोगी असल्यामुळे ती या प्रकरणात न देता एका जन्माच्या नतर दुसरा जन्म लवकर झाल्याची उदाहरणे प्रामुख्याने आम्ही या प्रकरणात देत आहो. लवकर जन्म झाल्याची उदाहरणे एकदर लोकसख्येच्या मानाने थोडी असली तरी पृथ्वीवर जर क्रोडो लोक आहेत तर त्या प्रकारची उदाहरणे ही मधून मधून सापडावी हे सहज आहे लवकर जन्म झाला असला तर पूर्वजन्मस्मृति ताजी असणार आणि म्हणूनच ती प्रकट होणे सुलभ होणार हे लक्षात ठेवले पाहिजे तसेच असल्या उदाहरणात बहुधा माणसाचा जडदेह फक्त नवा असतो व इतर देह (वासनादेह व मनोदेह) पूर्वजन्मातलेच असतात, आणि म्हणूनच पूर्व-जन्मस्मृति अगोदरच वासनादेहापर्यंत आलेली असते व एक पाऊल पुढे टाकून जडदेहात सहज येऊ शकते. या कारणामुळेही असल्या जन्मात पूर्वजन्मस्मृति प्रकट होण्याचा जास्त सभव असतो लवकर पुनर्जन्म होणे हे कशावर अवलबून असते त्याची सविस्तर माहिती सध्या उपलब्ध नाही लहानपणी मरण आल्यास किंवा अध्यात्ममार्गावर माणूस फार पुढे गेलेला असल्यास कधी कधी लवकर पुनर्जन्म होतो. पण इतर कारणामुळेही कधी कधी लवकर जन्म येत असण्याचा सभव आहे ब्रह्मी लोकासारख्या काही जातीत लवकर पुनर्जन्म झाल्याची उदाहरणे जास्त असावीत असे मानण्यास जागा आहे (पहा जिनराजदासकृत The Soul's Growth through Reincarnation The Lives of Ulysses पृ १७८) ते कसेही असले तरी या प्रकरणातील उदाहरणे पुराव्याच्या दृष्टीने महत्त्वाची असल्यामुळे ती आम्ही येथे नमूद केली आहेत त्यावरून ही उदाहरणे प्रातिनिधिक स्वरूपाची आहेत व सर्वांचे पुनर्जन्म त्या उदाहरणासारखे जलद होत असतात असा समज करून घेण्याचे कारण नाही

वाचकापैकी कित्येकास आठवत असेल. हे उदाहरण शातिदेवी नावाच्या एका नऊ वर्षाच्या मुलीचे असून त्याची सविस्तर हकीकत A Case of Reincarnation नावाच्या एका लहानशा पुस्तिकेत दिल्लीचे लाला देशबधु गुप्त ( तेज दैनिकाचे मॅनेजिंग डायरेक्टर ), पडित नेकीराम शर्मा ( एक राष्ट्रीय पुढारी ) व मि नाराचद माथुर ( ॲडव्होकेट ) या तिघानी प्रसिद्ध केलेली आहे. तीवरून दिसते की, १९२६ साली मि बी रगबहादुर माथुर यास एक मुलगी झाली तिचे नाव शातिदेवी ठेवण्यात आले ही मुलगी चार वर्षाची झाल्यावर आपल्या आईबापाशी पूर्वजन्मीच्या आठवणी बोलू लागली, आणि मी पूर्वी मथुरेस रहात होते, माझी जात चोबे होती वगैरे बऱ्याच गोष्टी सागावयास लागली. आईबापाना ही सारी वेडी बडबड वाटल्यामुळे त्यानी प्रारभी त्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही तरीही ती त्या गोष्टी वारवार बोले व माझ्या मनात मथुरेस जावयाचे आहे असे म्हणे लहान मुलास पूर्वजन्मीची आठवण झाल्यास ते मूल अल्पायुषी होते अशी तिच्या आईबापाची समजूत होती, म्हणून पुष्कळ दिवसपर्यंत असल्या गोष्टींस त्यानी बिलकुल उत्तेजन दिले नाही पुढे १९३४ चे सुमारास दर्यागज (दिल्ली) येथील शाळेतील एक मि बिशनचद नावाचे शिक्षक तिच्या वडील नातलगापैकी होते, त्यानी तिला सागितले की, तू मला तुझ्या पूर्वजन्मीच्या नवऱ्याचे नाव साग, म्हणजे मी तुला मथुरेस नेईन तेव्हा शातिदेवीने पडित केदारनाथ चोबे असे नवऱ्याचे नाव सागितले. ही बातमी पुढे लाला किशनचद, एम ए (सेवानिवृत्त प्रिंसिपल) दर्यागज, दिल्ली, याचेपर्यन्त गेली व त्यानी मुलीची भेट घेतली पडित केदारनाथ चोबे याचा मथुरेचा पत्ता वगैरे कित्येक गोष्टी मुलीस विचारल्या, त्याचे टिपण केले व पडित केदारनाथ यास त्या पत्त्यावर मथुरेस पत्र पाठवून चवकशी केली आश्चर्याची गोष्ट ही की पडित केदारनाथ चोबे याचेकडून त्यांस उत्तर आले व मुलीने सागितलेल्या गोष्टी स्थूल मानाने बरोबर आहेत असे त्यात लिहिलेले आढळले आपल्या पत्रात

पंडित केदारनाथ यांनी अशी सूचना केली होती की, दिल्लीस पंडित कानजीमल नावाचे आपले एक नातेवाईक आहेत, त्यांची व मुलीची भेट करवावी त्याप्रमाणे कानजीमल यांची लाला किशनचंद यांसह भेट झाली व त्या भेटीत शांतिदेवीने कानजीमल यांना आपल्या नवऱ्याचे नातलग म्हणून ओळखले व पुष्कळ प्रश्नांची समाधानकारक उत्तरे दिली ही सारी हकीकत पंडित केदारनाथ यांस मथुरेस पत्राने कळविण्यात आल्यानंतर केदारनाथ आपला दहा वर्षांचा मुलगा व नूतनपत्नी यांसह दिल्लीस येऊन शांतिदेवीस ( नवंबर १३, १९३५ रोजी ) भेटले त्या भेटीत शांतिदेवीने त्यांना ओळखले व ती त्यांना पाहून लाजली आणि तिच्या डोळ्यांतून अश्रूधारा वाहू लागल्या या भेटीतही मुलीने पुष्कळ माहिती सांगितली

कानजीमल व लाला किशनचंद यांच्या भेटीत केदारनाथ यास फक्त एक वडील भाऊ आहे, मथुरेचे घर चौबे रस्त्यावर आहे, त्या घरासमोर एक वाण्याचे दुकान होते, मी घरात वरच्या मजल्यावर काही रुपये पुरून ठेविले होते, मला एक मुलगा व मुलगी अशी दोन अपत्ये होती वगैरे माहिती शांतिदेवीने सांगितली

पुढे ता २४ नवंबर १९३५ रोजी लाला देशबंधु गुप्त, पंडित नेकीराम शर्मा, व ताराचंद माथुर या त्रिवर्गांनी आपल्या मित्रांसह शांतिदेवीला मथुरेस रेल्वेने नेले. स्टेशनवर तिने केदारनाथ यांचे वडील भावास (दिरास) ओळखले व लवून नमस्कार केला. मग तिला घोड्याच्या गाडीत पुढे बसविण्यात आले व ती दाखवील त्या रस्त्याने गाडी चालव असे गाडीवानास सांगण्यात आले तिने घरचा रस्ता बरोबर दाखविला घरात सासरा होता, तिने त्याला ओळखले व पाया पडून प्रणाम केला घरात पूर्वी विहीर होती व ती अलीकडे बंद केलेली होती ती जागा तिने दाखविली पैसे पुरलेली जागाही तिने दाखविली तेथे खणण्यात आल्यावर ऐवज पुरून ठेवण्याची तयार केलेली जागा आंत आढळली, पण त्यात पैसे नव्हते चवकशी करता केदारनाथ

यांनी बायको मेल्यावर ते पैसे तेथून काढून नेल्याचे समजले तिचे पूर्वजन्मीचे माहेरचे घरही मथुरेतच होते तेथे तिला नेल्यावर सुमारे चाळीस पन्नास माणसांमधून तिने आपल्या आई-बापास ओळखले व तिला अतिशय रडू कोसळले ही माहिती लिहिणारे लेखकत्रय लिहितात की, तिचा त्या वेळचा सारखा अश्रुपात पाहून माणसे पूर्वजन्मीच्या गोष्टी विसरतात ही एका अर्थी ईश्वराची कृपाच आहे असे आम्हास वाटू लागले!!!

या उदाहरणातील पुरावा जोरदार आहे असे आम्हास वाटते आमच्या वाचकासही बहुधा तसेच वाटेल पण या उदाहरणासंबंधाने काही आक्षेप घेण्यात आले आहेत[1] त्यांचा येथे विचार करणे अवश्य आहे

## संशोधन कसें पाहिजे ?

असल्या उदाहरणाचे संशोधन तज्ज्ञ शास्त्रज्ञाच्या हातून झाले तर ते अधिक चांगल्या प्रकारचे व विश्वसनीय होईल हे उघड आहे पण अद्यापि तशी वेळ आलेली दिसत नाही मेस्मेरिझमचे शास्त्र वैद्यक शास्त्राशी संलग्न असल्यामुळे डॉक्टर लोकांनीच मेस्मेरिझमचे प्रथम संशोधन केले असावे असे वाचकास वाटेल. पण वस्तुस्थिति अशी आहे की. डॉक्टर नसणाऱ्या लोकांनी त्या शास्त्रातील गोष्टी प्रथम जगासमोर आणल्या व त्या वेळी हे शास्त्र सर्व झूट आहे अशी ओरड डॉक्टरांनी केली जेव्हा झूट म्हणून भागेना, व त्या शास्त्राचे प्रयोग फैलावू लागले तेव्हाच डॉक्टर मंडळी त्यात पडली व हे प्रयोग खरे आहेत, असे त्यास आढळून आले परलोक-विद्येचे प्रयोग खोटे आहेत की खरे आहेत हे शास्त्रज्ञास तपास करून ठरविता येईल पण या चळवळीस १८५० चे सुमारास सुरवात झाली असताही बहुतेक शास्त्रज्ञांनी

---

१ 'पुनर्जन्मकी पर्यालोचना' नामक एका छोटचा हिंदी पुस्तकात ते सापडतील हे पुस्तक वालचंद नाहटा यांनी लिहिलेले असून बुद्धिवादी संघ, १० अरमीनियन स्ट्रीट, कलकत्ता यांनी १९३६ साली प्रसिद्ध केले आहे.

हा विषय अद्याप अगाबाहेर टाकला आहे जे थोडेसे शास्त्रज्ञ या प्रयोगात पडले, त्यास इतर शास्त्रज्ञानी नाक मुरडावे असेच सामान्यत. शास्त्रज्ञाचे धोरण असे व आहे सर वुइल्यम क्रूक्स हे या प्रयोगात जेव्हा पडले तेव्हा त्याची F. R. S. ची पदवी काढून घ्यावी असा बूट इतर शास्त्रज्ञानी काढला होता असे समजते[१] स्वत प्रयोग करावयाचे नाहीत आणि हे सारे झूट आहे असे मात्र म्हणावयाचे, असेच पुष्कळ शास्त्रज्ञाचे धोरण आहे शास्त्रीय सशोधकापैकी वहुतेकामध्ये असल्या गोष्टीविषयी जिज्ञासा नसते, पण त्यावर झूट म्हणून शिक्का मारण्याचा आग्रह मात्र असतो काही वर्षामागे मुबईच्या बाजूस एका माणसाने भोलानाथ नावाचा बैल आणला होता अमक्या नावाचा माणूस कोण, अमक्याचे घड्याळ कोणाच्या खिशात आहे, हा हातरुमाल कोणाचा आहे, वगैरे सारख्या नाना प्रश्नाची उत्तरे त्या त्या माणसाजवळ जाऊन व तेथे उभे राहून तो मागे आम्ही स्वत त्या बैलाला घरी आणवून, शभर दोनशे मित्रमडळीसमोर त्या बैलाचे प्रयोग केले व पचवीस प्रश्नापैकी चोविसाची उत्तरे त्याने बरोबर दिली हे प्रत्यक्ष पाहिले हा बैल गावोगावी हिडवण्यात आला व गमत पहाण्याच्या इच्छेने पुष्कळानी ते प्रयोग पाहिले व ते खरे असल्याचा अनुभव घेतला पण कोणीही तज्ज्ञ शास्त्रीय सशोधकाने ते तपासले नाहीत कोण-ताही आग्रह मनात न ठेवता फक्त सत्यसशोधनाच्या इच्छेने जर एकादा शास्त्रीय सशोधक ह्या बैलाचे प्रयोग पुन पुन्हा पाहून ते खरे आहेत की नाहीत याचा अनुभव लोकास मागेल, तर सामान्य माणसापेक्षा शास्त्रीय सशोधकाचे प्रयोग-नैपुण्य अधिक असल्यामुळे त्याच्या प्रयोगास जगात जास्त मान मिळेल हे उघड आहे पण सध्या तरी असल्या क्षेत्राचे शास्त्रीय सशोधकास वावडे असल्या-मुळे सामान्य लोकाच्या अनुभवावर भागवून घ्यावे लागत आहे. त्यास इलाज नाही

---

१ क्रुक्स कृत Researches in Spiritualism या पुस्तकातील प्रास्ताविक मजकुरातून तसा ध्वनि निघतो

एकादा शास्त्रज्ञ या क्षेत्रात पडला तर कधी कधी तो आग्रहाने व हट्टीपणाने वागतो, व सत्यसंशोधनाच्या मार्गांत अडथळे मात्र आणतो. विजेचे काही प्रयोग दमट हवेत होत नाहीत, किंवा फोटोग्राफीच्या काही प्रक्रिया उजेडात होत नाहीत हे सर्वांस माहीत आहे. अर्थात् या गोष्टी करावयाच्या असत्या तर विजेच्या प्रयोगाची सर्व उपकरणे माणूस कोरडी ठेवतो आणि फोटोग्राफीची कामे करण्यास नावडा दिला घेतो. अडचणी आल्या तर शास्त्रज्ञास युक्तिप्रयुक्तीने त्यातून मार्ग काढावा लागतो, तेव्हाच संशोधन यशस्वी होते. पण पुष्कळ शास्त्रज्ञ असल्या क्षेत्रात आले तर घोड्यावर बसलेल्या माणसासारखे गुर्मीने येतात, व आपण लबाड्या शोधण्यात पटाईत आहो असा खोटा अभिमान धरून भलतेच करतात. मिसेस पायपर नावाची एक स्त्री झोपत बोलू शके. ती झोपेत काय माहिती सांगते याबद्दल प्रयोग करण्याच्या वेळी डॉ. स्टॅन्ले हॉल यांनी तिची झोप खरी आहे की नाही हे तपासण्याचे ठरविले, व तिला टाचण्या टोचणे तिच्या अंगावर पलिस्तरे मारणे वगैरे गोष्टी केल्या व त्याचा प्रयोगावर दुष्परिणाम झाला ![1] ईव्हा सी नावाच्या एका बाईच्या अंगातून एक जिवंत विलविलीत द्रव्य (Ectoplasm) काळोखात बाहेर पडत असे. ते द्रव्य बाहेर पडत असताना काही संशोधकांनी लबाडीचा संशय येऊन तिच्या अंगावर विजेचा प्रखर प्रकाश पाडला आणि ते द्रव्य हाताने पकडण्याचा प्रयत्न केला.[2] त्यामुळे ती बाई रक्त ओकू लागली व प्रकृति सुधारण्याकरिता बरेच दिवस तिला हवेवर पाठवावे लागले. फोटो तयार करण्याचे वेळी काळोख जरूर असतो. त्याचा संशय येऊन एकाद्याने कॅमेऱ्याला लाथ मारावी किंवा फोटोच्या काचा उन्हात आणून त्यावर चित्र दिसत

---

१ पहा, सायकिकल रिसर्च सोसायटीची प्रोसीडिंग्स् खंड २८ मधील मिसेस सिजविक याचा लेख.

२ पहा, श्रेंक नॉटझिंगकृत Phenomena of Materialisation पृ. ५, १७ व १९३.

नाही, म्हणून त्या भिरकावून द्याव्या अशासारखें हे होय फोटोच्या कामात लबाडी होऊ नये म्हणून जसा शहाणे लोक तांबडा दिवा लावतात तशी एकादी योजना कल्पकतेने तयार करून मिसेस पायपर याची झोप खरी आहे की नाही अथवा ईव्हा सीच्या अंगातून खरोखरीच तो पदार्थ निघतो की नाही हे या संशोधकाम पहाता आले असते पण ते तर घोड्यावर बसलेले !! रायशेन-बाख नावाच्या एका माणसाचे म्हणणे होते की, लोहचुंबकातून अदृश्य असा प्रकाश बाहेर पडत असतो माणसास दोन तीन तास अगदी मिट्ट काळोखात बसवून त्याची दृष्टि जराशी जास्त संस्कार-क्षम झाली आणि मग त्याच्यासमोर काळोखात लोहचुंबक धरला तर त्यांतून निघणारा प्रकाश त्या माणसास दिसतो असे तो म्हणे पाच पन्नास माणसावर असले प्रयोग करून त्या अनुभवावर हे विधान त्याने आधारलेले होते प्रसिद्ध शास्त्रज्ञ प्रो टिंडल याचा व रायशेन-बाख याचा या गोष्टीविषयी विचारविनिमयही झालेला होता प्रो टिंडल यानी रायशेन-बाख याच्या प्रयोगातल्या प्रमाणे काही माणसास काळोखात बराच वेळ बसवून व मग त्याच्यासमोर लोहचुंबक धरून त्याच्या सभोवती त्यास प्रकाश दिसतो की नाही ते तपासले असते, व दिसत नाही असा त्यास अनुभव आल्यास जर त्यानी रायशेन-बाख याचे विधान चुकीचे आहे असे म्हटले असते तर कोणाचीही तक्रार राहिली नसती पण आपल्या खिशात एक लोहचुंबक ठेवून एकदा ते एका हस्तका-कडे (medium) गेले व तो लोहचुंबक हस्तकाला ओळखता आला नाही हे पाहून रायशेन-बाख याचे प्रयोग निराधार व खोटे आहेत असे त्यानी ठरविले [1] यावरून दिसून येईल की, ज्या जिज्ञासेने, ज्या निःपक्षपातीपणाने, व ज्या परिश्रमाने शास्त्रज्ञ आपल्या शास्त्रात पुनः पुन्हा निरनिराळे प्रयोग करून सत्य शोधनात ती वृत्ति अजिबात विसरून ते ह्या नव्या क्षेत्रात येतात, आणि भीक नको पण कुत्रा आवर अशी स्थिति कधी कधी उत्पन्न करतात

१ टिंडल याचा Science and the Spirits हा निबंध पहा.

## कांहीं आक्षेप

यामुळे हे संशोधन बहुतांशी शास्त्रीय संशोधनास पारख्या असणाऱ्या लोकांकडून करण्यात येते अर्थात् त्यांत दोष रहातात मला पूर्वजन्मीची आठवण आहे असे जेव्हा शांति-देवी म्हणू लागली, तेव्हा कोणताही गाजावाजा न करता निःपक्ष-पाती मानसशास्त्रवेत्त्या तज्ज्ञांनी खऱ्या जिज्ञासेने तिची आठवण कितपत विश्वसनीय आहे हे काळजीपूर्वक तपासले असते तर ते उत्कृष्ट झाले असते तिने जी आपल्या पूर्वजन्मीची म्हणून माहिती सांगितली व जी पुढे खरी ठरली ती तिला अन्य रीतीने मिळाली होती की काय, असा एक आक्षेप घेण्यात आलेला आहे हे संशोधन तज्ज्ञांनी केलेले नसल्यामुळे या आक्षेपास अगदी समर्पक असे उत्तर देता येत नाही हे खरे आहे पण मथुरेस जाण्याच्या अगोदर ज्या गोष्टी तिने सांगितल्या व ज्या मथुरेस जाऊन नंतर खऱ्या ठरल्या, त्या सर्व तिला अगोदर अन्य रीतीने समजलेल्या असतील असे म्हणणे म्हणजे अवास्तव ओढाताण करणे होय दिरास व इतर नातेवाईकांस ओळखणे, विहिरीची पूर्वीची जागा ओळखणे, पैसे पुरल्याची जागा ओळखणे वगैरे गोष्टींची अशा रीतीने वासलात लावू शकत नाही लाला किशन-चंद यांनी दिल्लीस मुलीची भेट घेऊन मिळालेल्या माहितीचे टिपण केले व ते मागील जन्मीच्या शांतिदेवीच्या नवऱ्याकडे (पंडित केदारनाथ यांचेकडे) मथुरेस पाठविले व या टिपणा-तील माहिती स्थूल मानाने बरोबर आहे असे पंडित केदारनाथ यांनी लाला किशनचंद यास उत्तरी लिहिले या पडताळ्याचा खुलासा वरील आक्षेप घेणाऱ्यास करता येणे जवळ जवळ अशक्य आहे दुसरा एक असा आक्षेप घेण्यात आलेला आहे की, शांतिदेवीला जर याच जन्मातील अगदी लहानपणाच्या कित्येक गोष्टी आठवत नव्हत्या तर पूर्वजन्मीच्या कशा आठवणे शक्य आहे? या आक्षेपात अर्थ नाही, कारण माणसाची आठवण सगतवार असतेच असे नाही, कालमानानें आठवणीतील

काही गोष्टी बुजतात व काही जागृत रहातात एकाद्या माणसास अगदी लहानपणची एकादी महत्त्वाची गोष्ट आठवते. पण यानतर झालेल्या हकीकती आठवू शकत नाहीत ते कसेही असले तरी काही गोष्टी शातिदेवीला आठवल्या नाहीत याचे निमित्त करून ज्या आठवल्या व ज्याच्या पडताळा आला त्याचे महत्त्व कमी करणे न्यायास धरून नाही

आणखीही एक आक्षेप घेण्यात आला आहे, तो पुण्याच्या प्रज्ञानेश्वर यतीनी घेतलेला आहे तो असा शातिदेवीला पूर्वजन्मी मुले झालेली होती मुले कशी होतात या क्रियेविषयी शातिदेवीला प्रज्ञानेश्वर यतीनी बरेच प्रश्न विचारले मुले आईच्या पोटात तयार होतात असे तिने सागितले आईच्या पोटात ती कोठून येतात असा प्रज्ञानेश्वर यतीनी पुन प्रश्न केल्यावर ईश्वर ती तेथ निर्माण करतो असे मुलीने सागितले पोटात मूल निर्माण होण्याच्या अगोदर स्त्रीपुरुष-सबध व्हावा लागतो हे त्या मुलीला सागता आले नाही, अर्थात् तिला पूर्वजन्मीची आठवण आहे हे म्हणणे खोटे आहे असा प्रज्ञानेश्वराचा आक्षेप आहे पण या आक्षेपातही अर्थ नाही काही गोष्टी सागता आल्या नाहीत ह्यावरून ज्या सागता आल्या व ज्याचा पडताळा आला, त्याची वासलात कशी लावता येणार ? त्या मुलीला पूर्वजन्मीची सपूर्ण, सगतवार, खडान् खडा माहिती होती असे कोणाचेच म्हणणे नाही जी तिला माहिती होती तिचा पडताळा मिळाला की नाही, व त्या पडताळ्यावरून शातिदेवी ही पूर्वजन्मी मथुरेस होती हे ठरते की काय, इतकाच आपला प्रश्न आहे, व त्याचे उत्तर अस्ति-पक्षी द्यावे लागेल पूर्वजन्मीची आठवण होणे स्वाभाविक नाही एका मेदूत जी आठवण साठविलेली होती ती, तो मेदू नष्ट झाल्यावर दुसऱ्या जन्मीच्या दुसऱ्या मेदूत आणणे अनैसर्गिक व कठिण असणार अशा स्थितीत जी आठवण येऊ शकली नाही, तिचे निमित्त करून जी येऊ शकली तिची किमत कमी करणे रास्त नाही

माणसाला रात्री स्वप्न पडले तर केव्हा केव्हा सकाळी तें थोडेफार आठवतें, पण काही तासानी ती आठवण बुजू लागते पूर्वजन्मीच्या आठवणी स्वप्नाच्या मानाने बुजण्याचा सभव कितीतरी अधिक आहे लहान आठ नऊ वर्षाच्या मुलीला बाप, आई, घर, रस्ता, पैसा, विहीर, दुकान वगैरे गोष्टीचा थोडा तरी अर्थ समजतो तितक्यापुरती तिच्या मेंदूची व मनाची तयारी असते अर्थात् तसल्या गोष्टी मेंदूतून व मनातून प्रकट होण्यास रस्ता मोकळा असतो ज्या गोष्टी समजण्याची मेंदूची व मनाची तयारी झालेली नाही ती आठवण प्रकट होणे दुर्घट आहे समजा मुले कशी होतात याची सर्व प्रक्रिया एकाद्याने त्या मुलीला उघड करून सागितली असती तरी ती तिला समजली नसती इतकी मुग्ध ती मुलगी होती अर्थात् अशा मुलीला त्या गोष्टीचा आठवण येऊ नये यात नवल नाही शातिदेवी पूर्वजन्मी स्वयपाक करीत असे, ती शाळेत जाऊन लेखन, वाचन, व्याकरण, त्रैराशिक शिकलेली होती जर तिला पूर्वजन्मीची आठवण आहे तर ती उपजतच या जन्मी स्वयपाक का करीत नाही, अथवा त्रैराशिकाची उदाहरणे का सोडवीत नाही, तिला शाळेत जाण्याची काय जरूरी आहे? असे विचारणे, व मुले कशी होतात हे या मुलीला का आठवत नाही हे विचारणे ह्या दोन्ही गोष्टी सारख्याच असमजस आहेत त्या मुलीच्या ज्ञानक्षेत्रात मावणाऱ्या ज्या अनेक गोष्टी होत्या त्याची माहिती विचारून व तिचे प्रत्यन्तर पाहून शातिदेवी ही पूर्वजन्मी केदारनाथ चोबे याची बायको होती की नाही याची शहानिशा करण्यास पुष्कळ वाव आहे त्यासाठी तिच्या समजुतीच्या पलीकडे असणारे कठिण प्रश्न तिला विचारण्याचे कारण नाही

पण बालचद नाहटा व प्रज्ञानेश्वर यति यानी असले प्रश्न विचारून विरुद्ध अनुमान काढले आहे ते अर्थात् गैर आहे खरोखरी पूर्वजन्मस्मृति ही क्वचित् दृष्टीस पडणारी उत्क्रान्ति-वेलीवरची अगदी नाजूक कळी आहे तिचा मुगध आस्वादावयाचा

असेल तर अगदी हळुवारपणाची, नाजूक फुंकर मारून, हलक्या हाताने ती फुलविली पाहिजे धसमुसळेपणाने तिच्या पाकळ्या वेडयावाकडया दिशेने ओढून ती कलिका फुलविण्याचा प्रयत्न केल्यास ती छिन्नविच्छिन्न होईल प्रज्ञानेश्वर यति आणि बालचद नाहटा यानी बुद्धीच्या दाडपट्टयाची दगल भाजवून ती कळी फुलविण्याचा प्रयत्न केल्यामुळे त्याचे हाती सत्य सापडले नाही. त्या अल्पवयी बालिकेकडे जाऊन 'तू खरे साग नाही तर तुला पाप लागेल' असे त्यानी तिला प्रथम बजावले बकऱ्यास जीव असतो म्हणून बकऱ्याचे मास खाऊ नये असे तू म्हणतेस, तर फळातही जीव असतो, तेव्हा तू फळे का खातेस, या कठिण मुद्दयावर तिचेपाशी वाद घातला, ईश्वर कसा असतो हा सर्वात कठिण प्रश्न तिच्यासमोर टाकला आणि मग आईच्या पोटात मुले कशाने निर्माण होतात हे तिला विचारले अर्थात् वकील जशी साक्षीदाराची उलट तपासणी करतो तशी त्यानी केली मनाच्या क्षितिजावर नुकतीच डोकाऊ लागलेली पूर्वजन्मस्मृति या उलट तपासणीच्या धूमधडाक्यात जर थड दिमेनाशी झाली असेल तर तो दोष त्या स्मृतीचा नव्हे ![1]

अगदी अलीकडे असेच एक उदाहरण सापडले आहे त्याची माहिती अलाहाबाद येथील लीडर नामक दैनिकाच्या २५।८।४९ च्या अकात सविस्तर प्रसिद्ध झालेली आहे. ती अशी[2] बाबू बकीलाल शर्मा एम् ए, हे उत्तर प्रदेशातील बिसौली येथल्या कॉलेजात एक प्राध्यापक आहेत त्याना १५ मार्च १९४४ रोजी एक मुलगा झाला लहानपणी बोलता येते न येते इतक्या वयाचा तो झाला असताना तो सहारणपूर, मोरादाबाद, मोहन वगैरे शब्द

१ या प्रकरणातील पुढील उदाहरणे वाचून त्यातील पुरावा किती किमतीचा आहे याचा हिशेब करताना ही सबध विचारसरणी ध्यानात ठेवणे जरूर आहे

२ मुबईच्या विविधवृत्त साप्ताहिकाच्या ४।९।४९ च्या अकात या उदाहरणाचा साराश आलेला आहे

बोलू लागला त्या मुलाला लोक प्रमोद या नावाने सबोधीत त्या प्र ..न मोहनलाल ब्रदर्स नावाची एक कपनी आहे व त्या कपनीची मुरादाबाद व सहरणपूर येथ दुकाने असून सोडावाटर बिस्किट वगैरे तयार करून विकण्याचा त्या कपनीचा धदा आहे ही कपनी श्री मोहनलाल या गृहस्थाच्या मालकीची आहे मोहनलालाना परमानद नावाचा एक भाऊ होता तो सहरणपूर येथे ९ मे १९४३ रोजी वारला हा प्रमोद पुढे म्हणू लागला की, मी परमानद आहे बिस्किटाचे एकादे मोठे दुकान दृष्टीस पडले की, प्रमोद सागे की माझे मुरादाबादचे बिस्किटाचे दुकान याहूनही मोठे आहे मला मुरादाबादला न्या, असे तो वारवार म्हणू लागला मला बायको, मुलगे, मुली वगैरे आहेत असे तो बोले

पुढे मोहनलाल याना ही हकीकत कळली व त्याच्या निमत्रणावरून प्रो बर्कीलाल यानी प्रमोदला मुरादाबादेस नेले मुरादाबाद स्टेशनवर आल्यावर प्रमोदने आपल्या गत जन्मीच्या भावास ओळखून तो त्यास कडकडून भेटला पुढे त्यास टाग्यातून गावात नेण्यात आले टाग्यातून प्रमादने टाऊन हॉल ओळखला व माझे दुकान आता जवळच आहे असे तो म्हणू लागला टागेवाल्याने मुद्दाम दुकानाशी गाडी थाबविली नाही तो तशीच ती पुढे चालवीत आहे, हे जेव्हा प्रमोदने पाहिले तेव्हा त्याने टागेवाल्यास मुद्दाम सागून गाडी थाबविली व खाली उतरून परमानद जेथे पूजा करीत असे त्या खोलीत जाऊन तेथे नमस्कार केला त्याने आपले अनेक नातेवाईक ओळखले दुकानांत वारवार येणारे गिऱ्हाईकही ओळखले, मृत परमानदाच्या एका नातलगाचे व्हिक्टरी हॉटेल नावाचे गावात एक हॉटेल आहे, तेथे प्रमोद गेला व तेथे कोणत्या नव्या खोल्या बाधल्या आहेत (ज्या पूर्वी नव्हत्या) त्या त्याने बिनचूक ओळखल्या आपल्या दुकानातले सोडावॉटरचे यत्र कसे चालवितात ते प्रमोद इतरास दाखवू शकला. मडळीनी त्याची कसोटी पहाण्यासाठी मुद्दाम ते

यत्र बद पाडले होतें त्याचे कारण प्रमोदने सहज ओळखले. साहू नदलाल सरण हे मुरादाबादचे एक प्रमुख नागरिक आहेत त्यानी प्रमोदला आपल्या मोटारीतून हिंडविले व त्या वेळी त्याने निरनिराळ्या इमारती न चुकता ओळखल्या प्रमोदला मुरादाबादच्या दुकानाचा इतका लळा लागला होता की, तो आपल्या गावी परत जाईना ! तेव्हा तो झोपेत असताना त्याला परत आपल्या गावी आणावे लागले ! ![1]

---

१ या उदाहरणाची शास्त्रीय चिकित्सा कोणी केलेली दिसत नाही ती कोणी शास्त्रज्ञाने कोणताही आग्रह न धरता केली असती तर त्याचा पुष्कळ उपयोग झाला असता हे उघड आहे

प्रकरण ६ वें

# आणखी कांहीं उदाहरणें

या प्रकरणात पौर्वात्य लोकामधील पूर्वजन्माच्या आठवणीची आणखी काही उदाहरणे देण्याचा मनोदय आहे असल्या कित्येक उदाहरणाचा शोध ग्वाल्हेर व अलवार येथील दिवाण रायबहादुर श्यामसुदरलाल सी. आय ई यानी बरीच वर्षे चालविलेला होता. पुनर्जन्माच्या आठवणीची अनेक उदाहरणे त्यास सापडलेली आहेत त्यातले एक उदाहरण भरतपूर सस्थानांतील सालेमपूर गावच्या प्रभु नावाच्या चार वर्षाच्या मुलाचे आहे[1] हा मुलगा मी पूर्वजन्मी हत्योरी गावात हरवक्ष नावाचा ब्राह्मण होतो असे सागू लागला व आपल्या त्या जन्मीची बरीचशी माहिती त्याने लोकास दिली तो हत्योरी गावास कधीच गेलेला नव्हता त्याचा जन्म १९१८ साली झाला होता लहानपणी तो प्रथम आपल्या आईबापाशी या हकीकती सहजासहजी सागू लागला उदाहरणार्थ आई रवीने ताक घुसळीत असताना तो लोणी माग-ण्यासाठी एकदा तिच्याजवळ बसला होता व तिने जेव्हा अगदी

---

१ या उदाहरणाविषयीची सविस्तर माहिती पडित श्याम सुदरलाल यानी Concrete Instances of Reincarnation with Memory of Past Lives या सदराखाली थिऑसफिस्ट मासिकाच्या १९२५ च्या जानेवारीच्या अकात पृ ५०८ वर दिली आहे ती माहिती प्रस्तुत लेख-काच्या सपादकत्वाखाली बरीच वर्षे चालू असलेल्या महाराष्ट्र थिऑसफिकल फेडरेशनच्या "धर्म-जागृति" नामक मासिकातही वाचकास सापडेल (पहा धर्म-जागृति अक सप्टेबर १९२३ पृष्ठ २५८)

थोडे लोणी त्याच्या हातावर ठेवले तेव्हा तो म्हणाला, मागच्या जन्मी माझी आई मला जास्त लोणी देत असे त्यावर मागच्या जन्मी तू कोठे होतास असे आईने त्याला विचारले मी हत्योरी गावात होतो व माझे नाव हरबक्ष होते असे त्याने सांगितले

पुढे ही बातमी गावभर पसरली व हळू हळू भरतपूरच्या महाराजाच्या कानावर गेली त्यांनी आपल्या नायब तहशील-दाराला त्या मुलाच्या घरी जाऊन त्या मुलाची पूर्वजन्मीच्या आठवणीविषयी सविस्तर जबानी घेण्यास सांगितले, ती त्या नायब तहशीलदाराने १९२३ च्या मार्च महिन्यात घेतली व पुढे श्यामसुदरलाल यांनी त्या मुलाला हत्योरी गावात नेण्याचा हुकूम केला त्याप्रमाणे त्या मुलास २३ एप्रिल रोजी हत्योरी गावात नायब तहशीलदाराने नेले तेथे नायब तहशीलदाराने पूर्वीच्या जबानीत आलेल्या गोष्टींची शहानिशा करविली त्याने गावातील काही वृद्ध व सभावित माणसास बोलावून आणिले व त्याच्या समक्ष आपली सारी चवकशी केली मुलाने सांगित-लेल्या व पहिल्या जबानीत असलेल्या अनेक महत्त्वाच्या गोष्टी खऱ्या असल्याचे त्या वेळी आढळून आले उदाहरणार्थ माझे पूर्वजन्मीचे नाव हरबक्ष असून त्या जन्माच्या बापाचे नाव मुडे होते चुन्नी व गिल्ला नावाचे मला भाऊ होते, शामलाल व घुरे नावाचे दोन मुलगे आणि भोली व कोकिला या नावाच्या मुली होत्या असे त्याच्या पूर्वीच्या जबानीत होते

हरबक्ष नावाचा कोणी ब्राह्मण पूर्वी गावात होता व त्याला या नावाचे नातेवाईक होते असे चवकशीत आढळले मात्र त्याने सांगितलेले सख्खे भाऊ खरोखरी चुलत भाऊ होते अशी माहिती मिळाली हत्योरीत माझी एक हवेली होती, माझ्या घराशेजारी स्वरूप जाट नावाचा माणूस रहात होता, त्याला एक मुलगा व एक मुलगी अशी अपत्ये होती व घराशेजारी एक उच अशी दग-डाची बांधलेली वाट होती ह्या पहिल्या जबानीत असलेल्या सर्व गोष्टी बरोबर असल्याचें दिसून आले. चवकशीच्या वेळी ती

हवेली मोडकळीस आलेल्या स्थितीत तहशीलदाराला आढळली. गांवात पिण्याच्या पाण्याच्या तीन विहिरी होत्या व त्याची नावे पन्हारीवाला, ककरवाला व मूलियावाला अशी होती गावात एक तळे असून त्यात एक घर होते असे त्या मुलाने आपल्या पहिल्या जवानीत सागितले होते ह्या नावाच्या विहिरी गावात आढळल्या तसेच गावातील तळे त्यातील घर हेही आढळले व मुलाने ते तळे ओळखले मी भोड गावात भिक्षुकी करीत असे, हे त्याचे म्हणणे खरे ठरले आणि चवकशीच्या वेळी त्याचा घुरे नावाचा मुलगा त्या गावाच्या देवळाचा पुजारी असल्याचे आढळले हरबक्षचा मामा कोणत्या गावचा होता, सासरा कोणत्या गावचा होता, त्या दोघाची नावे, बायकोचे नाव व टोपण नाव, गावाजवळ असलेला एक किल्ला व त्या सबधीची माहिती याही गोष्टी चवकशीअती बरोबर असल्याचे आढळले तहशीलदाराने त्या मुलास, आपल्या पूर्वजन्मीच्या मुलाचा (घुरे याचा) हात धरावयास सागितले व मुलाला आपले पूर्वजन्मीचे घर शोधावयास सागितले घर पडक्या स्थितीत होते व रस्ता वेडावाकडा होता, पण मुलाने आपल्या घरापर्यंत जाऊन ते घर ओळखले

या मुलाच्या पहिल्या जबानीतील सर्वच गोष्टी बरोबर आढळल्या असे नाही काही बाबतीत चुका आढळल्या व काही बाबीसबधाने चवकशीच लागली नाही हत्योरीच्या गावाची काही म्हातारी माणसे त्याला ओळखता आली नाहीत पण जरी काही बाबतीत चुका झाल्या असल्या तरी इतकी महत्त्वाची माहिती बरोबर निघाली की तिचा उलगडा पूर्वजन्माच्या उपपत्तीशिवाय होणे शक्य नाही फार जुन्या गोष्टीची आठवण करताना कोणीही माणूस काही बाबतीत चुकेल आठवण तितकी पक्की नाही इतकाच फार तर त्याचा अर्थ होईल

## अपघाताचीं उदाहरणें

श्यामसुंदरलाल यानी दिलेली आणखी उदाहरणे आपण

साराशरूपाने येथे पाहू या[1] ग्वाल्हेर संस्थानात म्होवा नावाचे एक गाव आहे तेथे छिडा नावाचा एक मनुष्य होता त्याचेवर चोरीची फिर्याद असल्यामुळे तो पळून गेला होता व चबल नदीच्या जवळ एका दरीत गुप्तपणे रहात होता त्याला त्या स्थितीत त्याच्या गावचा एक फेरीवाला भेटला छिडा याने त्याला पाच रुपये दिले व या पैशाची एक घटा विकत घे, आणि म्होवा गावच्या शिवमदिरात ती बाध असे त्याला सागितले पुढे छिडा याचा सुगावा पोलिसाना लागला व पोलिसानी त्याच्यावर गोळ्या झाडल्या, त्यात तो मेला उपरोक्त फेरीवाला आसपासच्या गावात नेहमी फेऱ्या करीत असे

काही वर्षांनी म्होवा गावच्या नजीकच्या दुसऱ्या एका गावी तो फेरीवाला गेला होता आणि तेथे एका घराजवळ आपल्या विक्रीच्या जिनसा उतरून त्या घरच्या बाईला तो त्या दाखवीत होता इतक्यात त्या बाईचा चार वर्षाच्या मुलगा तेथे आला व त्या जिनसातली एक जिन्नस घेऊन पळू लागला. फेरीवाल्याने धावत जाऊन त्याला धरले त्या वेळी मुलाने रागावून "माझ्या पैशाची घटा तू देवळात का बाधली नाहीस ?" असा त्याला प्रश्न केला त्यावरून हा मुलगा म्हणजे पूर्वीचा छिडाच होय अशी प्रथम त्या फेरीवाल्याची व नतर इतराची खात्री झाली मग मडळीनी छिडाच्या आईची व या मुलाची भेट करविली व त्या बाईने मुलाला म्होवा गावी नेऊन त्याच्याकडून छिडाचे घर शोधून काढविले श्यामसुदरलाल यानी त्या मुलाला आणवून स्वत पाशी ठेवून घेतले होते त्या वेळी त्याचा मामा मुलाबरोबर आला होता हा गृहस्थ शिकलेला होता व त्याने पूर्वीची सर्व हकीकत खरी असल्याचे श्यामसुदरलाल यास सागितले

आणखी दोन उदाहरणे पाहू ही दोन्ही श्यामसुदरलाल यानीच दिली आहेत, व छिडाच्या उदाहरणाप्रमाणे त्या दोहो-

---

१ पहा Concrete Instances of Reincarnation with Memory of Past Lives. थिऑसफिस्ट मासिक मे १९२५ पृ. २३४

मध्येही त्या माणसाला पूर्वजन्मी अपघातानेच मृत्यु आलेला आहे. काशीराम नावाचा एक तरुण पटवारी होता तो एका खटल्यात आपल्या जमीनदाराविरुद्ध साक्ष देण्यासाठी जात असताना जमीनदाराने त्याला वाटेत बदुकीची गोळी घालून ठार मारले. त्याच्या प्रताच्या उजव्या हाताची बोटे कापून टाकिली, एक कापलेले बोट पटवाऱ्याच्या दौतीत घालून व ती दौत त्या प्रेताच्या छातीवर ठेवून तो जमीनदार ब्रिटिश हद्दीत पळून गेला पुढे ते प्रेत पोलिसास सापडले प्रेतावरील जखमाच्या खाणाखुणा, तुटकी बोटे वगैरेचे बारकाईचे वर्णन पोलिसाच्या फायलीत आहे

रिसालपूर नावाच्या जवळच्याच एका खेड्यात पुढे एक मुलगा जन्मास आला. जन्मत च त्याच्या उजव्या हाताची बोटे तुटकी होती व देहावर खाणाखुणा होत्या. श्यामसुन्दरलाल म्हणतात, मी त्या मुलाला पाहिले आहे, व पोलिसाच्या फाइलीतील खुणाची माहितीही तपासून पाहिली आहे, व त्या खुणा जुळत आहेत या मुलाला मी पूर्वजन्मी तोच पटवारी होतो अशी आठवण आहे पडित श्यामसुन्दर यांनी त्या मुलाला आपल्यापाशी सुमारे आठ दिवस ठेवून घेतले होते व त्या मुलाला पूर्वजन्मीच्या (काशीरामच्या) मुख्य मुख्य गोष्टी आठवत असल्याबद्दल स्वत ची खात्री करून घेतली होती त्या वेळी मुलाची स्मरणशक्ति कमी होत आहे व पूर्वजन्मातील बारीक सारीक गोष्टी स्मृतिपटलावरून पुसून जात आहेत असा त्याना अनुभव आला त्या मुलाचा बाप व वडील भाऊ यानी त्याने मागितलेल्या बऱ्याच लहानमहान गोष्टीना श्यामसुन्दरलाल याचेसमोर दुजोरा दिला दुसरे उदाहरण दोन रजपूत जमीनदाराचे आहे. ते चुलते पुतणे होते शेतासबधाने दोघाचे भाडण होऊन चुलत्याने पुतण्याचा त्या भाडणाच्या वेळी बदुकीने खून पाडला व चुलता पळून गेला तो पोलिसाच्या हाती सापडला नाही व त्याच्या विरुद्ध त्याना पुरावाही मिळाला नाही ही गोष्ट इ. स १८७७ साली घडली काही काळाने चुलता घरी परत आला त्याच

सुमारास शेजारच्या एका खेड्यामध्ये एक मुलगा जन्मास आला तो मुलगा चार पाच वर्षाचा असताना देवळातल्या एका समारंभास गेला होता व दुसऱ्या मुलाबरोबर खेळत होता त्या समारंभात बदुकाचे बार काढण्यात आले त्या सरसा तो तात्काळ बेशुद्ध होऊन पडला पुढे काही वेळाने तो शुद्धीवर येऊन म्हणू लागला की माझा खून करणारा मनुष्य परत आला आहे हे ऐकून हा मुलगा तो पूर्वजन्मीचा पुतण्या असला पाहिजे असा लोकानी तर्क बाधला तेव्हा त्याच्या पूर्वजन्मीच्या भावाची व या मुलाची लोकानी भेट करविली त्या मुलाने त्या भावाला ओळखले, त्या दोघाची गट्टी जमली आणि तिऱ्हाइतास माहीत नसलेल्या अनेक गोष्टी त्या मुलाने त्या भावास सागून त्याची खात्री पटविली, व पूर्वजन्मीची आपली बदूक, पिस्तुल, काठी, वाजविण्याची वाद्ये मुलाने त्याच्यापासून मागून घेतली हा मुलगा आपला पूर्वजन्मीचा धाकटा भाऊ आहे, अशी त्या वडील भावाची खात्री झाली व त्याने मेजर ऑमर्ट याचेकडे चुलत्यावर फौजदारी काम चालविण्याचा उपक्रम केला पण असल्या पुराव्यावर जुने भाडण उकरून काढण्यास मेजर ऑमर्ट यानी त्याला परवानगी दिली नाही तेव्हा त्याने दिवाण सर गणपतराव खडके व महाराज जयाजीराव शिदे याचेसमोर आपले म्हणणे माडले त्यानी त्या मुलासमोर आपल्या सैन्यातील शिपायाची राग उभी केली तीत त्यानी पूर्वजन्मीचे त्याचे काही नातलग शिपाई मुद्दाम समाविष्ट केले होते त्याना त्या मुलाने ओळखल्यामुळे त्या दोघाची त्याच्या पूर्वजन्मस्मृतीबद्दलची खात्री झाली व खून करणाऱ्या चुलत्यावर त्यानी वॉरट सोडले पण तो ग्वाल्हेरच्या पोलिसाच्या हाती न लागता या गावाहून त्या गावास असा पळत चालला व शेवटी गया येथे मरण पावला त्यामुळे ती फिर्याद पुढे चालविता येईना

श्यामसुन्दरलाल म्हणतात की, या प्रकरणातील मूळ कागदपत्र मी पाहिले आहेत १९१२ साली तो मुलगा चौतीस वर्षाचा झाला होता त्या वेळी श्यामसुन्दरलाल याची व त्याची गाठ पडली

त्या वेळी त्याची पूर्वजन्मीची आठवण बुजून गेलेली होती असे ते लिहितात त्या वेळी त्या मुलाचा बाप बरोबर होता त्याने वर सांगितलेल्या गोष्टी खऱ्या असल्याचे श्यामसुन्दरलाल यास सांगितले बापाने असेही त्या वेळी सांगितले की, मुलगा पूर्वीचा कोण आहे याची त्याच्या भावाने लोकास माहिती सांगितल्यावर, तो खून करणारा चुलताही एकदा त्या मुलाला पहावयास आला होता, व त्या वेळी मुलाने त्याला टोमणा मारून विचारलें की, तू मला न कळत गोळी घातलीस व पाठीवर नेम धरलास हे तुझ्यासारख्या रजपुताला शोभते काय ? ग्वाल्हेरमधील सैन्यात कर्नल सुरजपालसिंग व त्या चुलत्याचा मुलगा असे अमलदार आहेत व त्या दोघानी वरील हकीकत खरी असल्याचे सांगितले असे श्यामसुन्दरलाल यानी लिहिले आहे

## जपानी व ब्रह्मी उदाहरणें

पूर्वजन्मीच्या आठवणीची एका जपानी मुलाची गोष्ट Gleanings in Buddha Fields या पुस्तकात नमूद आहे [1] या मुलाला पूर्वजन्मीची आठवण सहजासहजी झाली. पण तो त्या गोष्टी आईबापाशी बोलण्यास भीत असे आईबापाना त्या विषयीची माहिती त्या मुलाच्या बालमित्राकडून प्रथम समजली व त्यानी मुलाच्या मनातील भीति काढून टाकल्यावर तो त्या गोष्टी मोकळेपणाने बोलू लागला नतर त्या आपल्या पूर्वजन्मीच्या गावी जाण्याची 'मुलाला' इच्छा झाली व त्याच्या आईने त्याला तेथे नेले तेथे त्या मुलाने आपले घर बरोबर ओळखले, व त्या घरातील इतर मडळीपाशी चवकशी करता त्या मुलाने सांगितलेली पुष्कळ माहिती खरी असल्याचे दिसून आले

दुसऱ्या अनेक ग्रथकारानी पूर्वजन्मस्मृतीची स्वत पाहिलेली उदाहरणे नमूद केलेली आहेत The Soul of a People हे

---

१ लेडबीटरकृत The Other Side of Death या पुस्तकात हें उदाहरण वरील पुस्तकातून पृ ७९९ वर उद्धृत करून दिलेले आहे व आम्ही ते तेथूनच साराश रूपाने देत आहो.

Fielding Hall या ग्रथकाराने ब्रह्मदेशातल्या लोकासबधाचे पुस्तक लिहिले आहे त्यात तो लिहितो की, अनेक ब्रह्मी मुलाना पूर्व-जन्माची आठवण असते, पण मुलाचे वय वाढू लागले म्हणजे ती नाहीशी होऊ लागते मी स्वत अशा प्रकारची अनेक मुले पाहिली आहेत असे त्याने म्हटले आहे त्या विषयीची अनेक उदाहरणे त्याने आपल्या पुस्तकात नमूद केली आहेत त्याने एकदा ब्रह्म-देशात दोन जुळी मुले पाहिली त्याना मागील जन्माची आठवण होती मागच्या जन्मीच्या ठिकाणी त्याना नेल्यावर त्यानी तेथील रस्ते, घरे व माणसे ओळखली त्या मुलापैकी एकाला पूर्वजन्मी एका बाईकडून दोन रुपये उसनवार नेल्याची आठवण होती ती बाई जिवत होती, तिला विचारता तिने ती गोष्ट खरी म्हणून सागितली या मुलानी मला स्वत च्या पूर्वजन्मीची बरीच माहिती सागितली असे या ग्रथकाराने लिहिले आहे दुसरी एक मुलगी या ग्रथकाराला आढळली तिलाही अशीच आठवण होती, ती पूर्वजन्मी पुरुष होती असे सागून तिने त्याला त्या वेळची बरीच हकीकतही सागितली [१]

१ उपरोक्त पुस्तकाची १९०९ सालची आवृत्ति पहा या पुस्तकात एका वुद्ध भिक्षूची गोष्ट आहे ब्रह्मदेशात एके खेडेगावी एक भिक्षु होता त्याचा मठ फार लहान होता तो मोठा विस्तीर्ण असावा अशी त्याला महत्त्वाकाक्षा होती त्याने मठासाठी लाकडे पाहिजेत म्हणून झाडे लाविली होती पण काही वर्षांनी तो मरण पावला पुढे वरेच वर्षानी त्या गावी दुसरा एक भिक्षु आला त्याने लोकास सागितले की, मी परगावी होतो पण एकदम माझ्या मनात माझ्या पूर्वजन्मीच्या इतिहासाचा प्रकाश पडला व या गावी मृत झालेला भिक्षु तोच मी पुन. जन्म घेऊन आलो आहे त्याने गावातील अनेक खाणाखुणाची ओळख लोकाना पटवून त्या लोकाची खातरी केली त्या वेळी ती झाडे मोठी झाली होती ती त्याने तोडवून एक मोठा विस्तीर्ण मठ तेथे बाधण्यासाठी त्या लाकडाचा उपयोग केला व आपली पूर्वजन्मीची महत्त्वाकाक्षा पुरी केली ! पूर्वजन्माच्या आठवणीबद्दलची सर्व माहिती या पुस्तकातील The Potters Wheel नामक प्रकरणात ( पृ २९० ते पृ. ३०८ ) सकलित केलेली वाचकास सापडेल

प्रकरण ७ वें

# पुनर्जन्माचा प्रयोगसिद्ध पुरावा

मागील प्रकरणात पूर्वजन्माच्या आठवणीची पौर्वात्य उदाहरणे दिली आहेत या प्रकरणात पाश्चात्य देशातली उदाहरणे देत आहो ती वेगळच्या वळणाची आहेत हे वाचकाच्या ध्यानात सहज येईल प्रथम फार प्राचीन काळच्या आठवणी विचारात घेऊ व मग इतर प्रकाराकडे वळू

## निरिया

पहिले उदाहरण 'निरिया' नामक स्त्रीचे आहे [१] या स्त्रीच्या जीवनासबधाचे The Soul of Nyria नामक पुस्तक मिसेस कॅबेल प्रीड नावाच्या ग्रथकर्त्रीने प्रसिद्ध केले आहे या ग्रथकर्त्रीची एका इग्रज बाईशी मैत्री जडली होती ह्या दुसऱ्या बाईला अगात आल्यासारखे झटके येत असत त्या वेळी ती बेशुद्ध होई, आणि शुद्धीवर आल्यावर त्या बेशुद्ध स्थितीत आपण काय बोललो त्याची तिला आठवण रहात नसे या बेशुद्ध अवस्थेत ती अगदी वेगळच्या माणसासारखे वागे व बोले त्या वेळी तिचा आवाज, बोलण्याची पद्धति, तिची बुद्धिमत्ता या सर्वात मोठे स्थित्यतर झालेले आढळून येई प्राचीन काळी टिटस् नावाचा एक रोमन बादशहा होऊन गेला त्याला ज्यूलिया नावाची मुलगी होती व तिने एक गुलाम

---

१ Ralph Shirley कृत The Problem of Rebirth या पुस्तकात हे उदाहरण कांहीशा विस्ताराने दिले आहे तेथून आम्ही वरील माहिती सारांश रूपाने घेतली आहे

स्त्री स्वत स नोकर म्हणून ठेविलेली होती तिचे नाव निरिया होते मी ती निरिया आहे असे ही स्त्री बेशुद्ध स्थितीत म्हणत असे बोलताना ती अशा रीतीने वागे की त्या जुन्या काळात ती प्रत्यक्ष गेली आहे आणि त्या काळचा इतिहास तिच्या डोळ्यासमोर प्रत्यक्ष घडत आहे असे मर्वास वाटावे या स्थितीत असताना तिने त्या वेळच्या अनेक गोष्टी सविस्तर सांगितल्या पुन. पुन्हा त्या स्थितीत ती जाई व त्या वेळी ती जी हकीकत सांगे ती टिपण्यात येई आपण हा सारा इतिहास प्रत्यक्ष पहात आहो अशा आविर्भावाने ती सारी वर्णने करी आणि त्या काळच्या माणसाची व स्थळाची हकीकत बारकाईने देई डॉमीशन राजा, जूव्हेनल, मारशल, धाकटा प्लिनी, टॅसिटस ही इतिहासातील प्रसिद्ध माणसे तिच्या वर्णनात आलेली आहेत ज्या माणसाची माहिती इतर कोणाला नाही, फक्त त्या काळचा बारकाईने अभ्यास करणाऱ्या तज्ज्ञाना मात्र आहे, अशा तत्कालीन अप्रसिद्ध व्यक्तीही तिच्या वर्णनात आलेल्या आहेत उदाहरणार्थ आर्चिजेनीस नावाचा एक डॉक्टर, मॅथो नावाचा वकील, युफ्रेटीस नावाचा तत्त्वज्ञ वगैरेची माहिती प्रथम या बाईच्या तोडून निघाली व मग त्या जुन्या काळच्या उपलब्ध कागदपत्राचे ज्यानी बारकाईने अध्ययन केले आहे त्याच्याकडून ते जुने वाङमय तपासवून ती माहिती खरी असल्याचे दिसून आले आहे उदाहरणार्थ या बाईच्या सागण्यात आले की, आपण निरियाच्या जन्मात असताना प्लिनीची पहिली बायको वारली व त्यामुळे त्याच्या मनास जबर धक्का बसला होता, व त्या दु खाचे शल्य मनास बोचत असता वेळी तो टस्कनीमधील ज्या घरात रहात होता त्याच घरात निरियाची यजमानीण व्हलेरियाही कांही दिवस रहावयास आलेली होती प्लिनीच्या या पहिल्या बायकोची माहिती कोणालाही नव्हती , त्याच्या नतरच्या दोन बायकाची माहिती तज्ज्ञानाच होती व प्लिनीने फक्त दोनदा लग्न केले होते, अशीच त्याची समजूत होती. पण प्लिनीचे उपलब्ध लिखाण व कागदपत्र वाचल्यावरून असे दिसून आले की, प्लिनीने एकदर तीन

ग्नें केली व त्याची पहिली बायको, निरिया हयात असताना ारली व दुसऱ्या दोन बायका निरियाच्या मृत्यूनंतर वारल्या नशा प्रकारे हे वर्णन सत्याच्या कसोटीस उतरले त्या जुन्या रोमन काळच्या चालीरीतीचे सविस्तर चित्रण त्या बाईने केले आहे ल्लनीची तिसरी बायको कॅल्परनिया, तिची आत्या हिप्सुला, डॉमिशन बादशहाचा खून करणारा व निरियाचा प्रियकर स्टेफा-नस, त्या काळची कवयित्री सल्पिशिया, डॉमिशन राजाची नर्स फिलिस्, डॉमिशियाचा प्रियकर व तत्कालीन नट पॅरिस, टिटस बादशहाची मुलगी जूलिया वगैरे व्यक्तींची वर्णने तिने केली होती व त्या काळचे वाङ्मय नंतर सूक्ष्म बुद्धीने चाळून पहाता त्या वर्णनातील कितीतरी गोष्टी जमल्याचे आढळले जूलिया ही डॉमिशन राजाची पुतणी होती व तिने त्याच्याबरोबर, अनेक नाताळयत्री कारस्थाने चालविली होती त्याचीही वर्णने तपासून पहाता जमली [१]

या इंग्रज बाईचे शिक्षण बेताचेच होते बेशुद्ध स्थितीत ती ज्या गोष्टी सांगे त्या तिला अन्य मार्गाने समजण्यासारख्या नव्हत्या तज्ज्ञ माणसास कामास लावून व त्याच्या साहाय्याने पूर्वकालीन इतिहासातील कोनाकोपऱ्यातील गोष्टी धुंडाळून तिच्या माहितीचा खरेखोटेपणा नंतर कसास लावावा लागला. असल्या तज्ज्ञास असणारे भाषेचे व जुन्या इतिहासाचे ज्ञान त्या स्त्रीला नव्हते, व संशोधकास जरूर असणारी हुशारीही तिच्या अंगी नव्हती असे असताना तिने मी मागे रोमन काळी निरिया नावाची स्त्री होते

---

१ Mrs Campbell Praed या बाईने निरिया नावाचे आणखी एक पुस्तक लिहिले आहे (प्रकाशक टी फिशर उनविन १९०४) हे पुस्तक म्हणजे वरील माहितीवर आधारलेली एक कादंबरी आहे या बाईने या पुस्तकातील To My Readers नामक प्रस्तावनेत लिहिले आहे की झोपेतील बेशुद्ध स्थितीत असताना एका स्त्रीने आपला पूर्वजन्मीचा इतिहास सगतवार बोलून दाखविला व त्या आधारावर मी ह्या कादंबरीचे कथानक उभारलेले आहे

असे म्हणावे व त्या वेळची जी तिने माहिती सांगितली ती नंतर खरी ठरावी, यावरून तिला पूर्वजन्मीची आठवण होत होती असे मानणे अवश्य आहे पूर्वजन्माच्या आठवणीचा तो एक चांगल्या प्रकारचा पुरावा आहे

## ईजिप्तमधील उदाहरण

पुराव्याच्या दृष्टीने जास्त सरस असे एक उदाहरण अलीकडे प्रसिद्ध झालेले आहे[1] त्याबद्दलचे संशोधन दोन इंग्रज गृहस्थानी केलेले आहे पैकी ए जे एच् हुलम हे प्राचीन इजिप्शियन भाषेचे एक ऑक्सफर्ड येथील तज्ज्ञ असून त्या भाषेसबधाने त्यानी ग्रथही लिहिले आहेत दुसरे गृहस्थ एफ् एच् वूड होत हे सगीतज्ञ आहेत आणि बहुमनस्कता, चमत्कार-संशोधन वगैरे गोष्टीबद्दल ते प्रयोग करीत असतात इग्लडमधील एका सुसस्कृत व सुशील स्त्रीची व मि वूड याची प्रथम गाठ पडली या स्त्रीला झोप आली की ती त्या स्थितीत बोलू व लिहू शके या स्त्रीला 'रोजमेरी' नावाचे एक साकेतिक नाव दिलेले आहे ही स्त्री कधी पूर्णपणे निद्रिस्त असे, कधी अर्धवट निद्रिस्त व विमनस्क स्थितीत जाई या स्थितीत ती जेव्हा बोले किंवा लिही तेव्हा ती स्वतःला उद्देशून 'नोना' हे माझे नाव आहे असे नेहमी सांगे पुष्कळदा ती इग्रजी भाषत बोले अथवा लिही पण पुष्कळदा प्राचीन काळच्या ईजिप्शियन भाषेचाही उपयोग करी ही ईजिप्शियन भाषा आज मृत झाली असून काही थोडे तज्ज्ञ सोडून दिले तर ती कोणासही सध्या समजत नाही मि वूड यानी आपल्या प्रयोगाची माहिती प्रथम जेव्हा प्रसिद्ध केली तेव्हा त्यात 'नोना' हे नाव प्रकट झाले या नावाचा प्राचीन ईजिप्शियन भाषेशी काही सबध असावा असा मि हुलम याना सशय आल्यावरून त्यानी मि वूड

---

१ या उदाहरणाची सविस्तर माहिती **Ancient Egypt Speaks** या पुस्तकात वाचकास सापडेल हे पुस्तक **A. J. H Hulme** व **F H Wood** या दोघानी लिहिलें असून **Ride & Co** हे प्रकाशक आहेत

याशी पत्रव्यवहार सुरू केला माझे नाव ' नोना ' आहे, मी बॅबिलोनच्या राज्यात राजकुळात जन्मले होते, पुढे ईजिप्तचा फराओ (सम्राट) जो तिसरा ॲमेनहोटेप याच्याशी माझा विवाह झाला, वगैरे बरीच माहिती त्या अवस्थेत असताना रोजमेरी सागे इतिहास-सशोधकानी हा सम्राट ख्रि पू १४०० च्या सुमारास होऊन गेला असे ठरविले आहे ही ' नोना ज्या रोजमेरीच्या मुखाने बोले त्या रोजमेरीला ती ' व्होला या नावाने सबोधी त्या राजाच्या कारकीर्दीत ही 'व्होला' विद्यमान होती, माझी तिची त्या वेळी दाट ओळख होती, मजसारखी तीही मूळची राजकुलातील असून युद्धात माझ्यासारखी माझ्याबरोबर पकडण्यात येऊन ईजिप्तमध्ये बदिवान म्हणून आणलेली होती, पुढे ईजिप्तमध्ये मी राज्ञीपदावर आरूढ झाल्यावर माझा वशिला लावून तिला मी एका प्रसिद्ध देवालयात नर्तकीची एक सन्माननीय जागा देवविली, वगैरे माहिती ती सागे ही सर्व माहिती मि वूड लिहून घेत. ती पुष्कळ वेळा प्राचीन ईजिप्शियन भाषेत बोले मि वूड याना ती भाषा अवगत नव्हती अर्थात् ते त्या भाषेतील शब्दाचे उच्चार इग्रजी अक्षरानी टिपीत, ही टिपणे मि हुल्म याजकडे पोस्टाने पाठवीत मग मि हुल्म ते शब्द प्राचीन ईजिप्तच्या चित्रलिपीत (Hieroglyphs) उतरीत व त्या मजकुराचे इग्रजी भाषातर करून ते मि वूड याचेकडे पाठवीत फक्त काही थोड्या प्रयोगात मि. हुल्म व मि वूड हे दोघेही हजर असत

या प्रयोगातील सर्वात आश्चर्याची गोष्ट म्हणजे ' नोना ' जी भाषा बोले ती खरोखरीच प्राचीनकाळची ईजिप्शियन भाषा असे या भाषेत पुष्कळ सदेश आले, इतके की त्यातील शब्दसग्रहातून एक मध्यम आकाराचा ईजिप्शियन भाषाकोषही तयार होऊ शकेल असे मि हुल्म यानी लिहिले आहे [१]

---

१ That material has provided words enough to constitute a dictionary sufficiently complete for average purposes

जी भाषा रोजमेरीला माहीत नाही, वूड यानाही माहीत नाही, मात्र जी जगातील मूठभर तज्ज्ञानाच फक्त माहीत आहे ती भाषा रोजमेरीच्या तोडाने नोना भराभर बोले ! त्या भाषेचे आजचे तज्ज्ञ ती भाषा मोठ्या कष्टाने वाच शकतात व ती वाचण्यास त्यास पुष्कळ वेळही लागतो इतकी दुर्गम ती भाषा आहे पण नोना ती मोठ्या सफाईने बोले, व्याकरणशुद्ध रीतीने व बिनचूक बोले तेव्हा नोना ही खरोखरीच प्राचीन काळी ईजिप्तमध्ये जन्मलेली असावी हे म्हणणे सयुक्तिक वाटते मी पूर्वीच्या एका जन्मी ईजिप्तमध्ये जन्मलेले होते व त्या वेळच्या माझ्या आठवणीवरून ही हकीकत निवेदन करीत आहे असे ती स्पष्टच सागे

असल्या उदाहरणावर एक आक्षेप येण्याचा सभव असतो. तो असा की कोणत्या तरी जिवत माणसाच्या मनातून हे सारे विचार निघालेले असून ते रोजमेरीच्या मनात गेलेले असतील, ते नोना नावाच्या पूर्वी ईजिप्तमध्ये जन्म घेतलेल्या व सध्या मृत असलेल्या बाईच्या मनातून निर्माण झालेले नसतील, आणि त्यामुळे नोनाचे अस्तित्व या प्रयोगावरून सिद्ध होऊ शकत नाही जी भाषा जगात फारच थोड्या लोकास अवगत आहे व जिचे मूळचे उच्चार आज जगात एकाही माणसाच्या कानावर पडले नाहीत ती भाषा व ते उच्चार एकाद्या जिवत माणसाच्या मनातून उगम पावलेले असतील हा आक्षेप कोणाही विचारी माणसास पटण्याजोगा नाही

ईजिप्शियन भाषेची जी माहिती वरील प्रयोगात उपलब्ध झाली ती फार उपयुक्त आहे असे मि हुल्म याचे म्हणणे आहे. आजचे तज्ज्ञ जरी ही भाषा वाचण्यास समर्थ असले तरी उच्चार नीट माहीत नसल्यामुळे ती त्यास बोलता येत नाही नोना ती बोलत असल्यामुळे ती त्या काळी कशी बोलली जात असे हे आज तज्ज्ञास समजले आहे हे बोलणे कोणासही वाटेल तेव्हा ऐकता यावे म्हणून १९३६ साली इटरनॅशनल इन्स्टिटयूट फॉर सायकिकल रिसर्च (लडन) या सस्थेने त्या बाईचा एक

प्रयोग केला व तिच्या तोडची इजिप्शियन भाषा ग्रामोफोनच्या मुद्रिकेवर घेऊन तिला कायम स्वरूप आणून दिले या मुद्रिकेवर लहान मोठी छत्तीस वाक्ये घेतलेली आहेत ईजिप्शियन भाषेविषयी आजच्या तज्ज्ञास पुष्कळ प्रश्नानी अडविलेले आहे त्या प्रश्नावर नोना हिने दिलेल्या माहितीचा पुष्कळच प्रकाश पडत असून कित्येक प्रश्न नीट उलगडण्यातही आलेले आहेत

नोनाने सांगितलेल्या इतर अनेक गोष्टीनाही पुरावा मिळालेला आहे मी स्वत बॅबिलोनच्या राजघराण्यात जन्मले असून ईजिप्तच्या सम्राटाशी माझे लग्न झाले होते असे नोनाच्या सांगण्यात आले तिसरा ऑमेनहोटेप या सम्राटाने एका बॅबिलोनच्या स्त्रीशी विवाह केला होता ही गोष्ट ईजिप्तच्या इतिहास-संशोधकानी मुक्रर केली आहे मोठमोठ्या इमारती बाधण्याचे या राजाला जणू व्यसन होते असे नोना म्हणाली ही गोष्टही ईजिप्तच्या इतिहासात नमूद आहे या राजाची प्रकृति बरी नसे, व त्यामुळे तो अशक्त झाला होता ही माहिती नोनाच्या वर्णनात आलेली होती हा राजा आजारी असल्याची गोष्ट त्या इतिहासात दाखल आहे. या राजाचे मसाला घालून सुकविलेले प्रेत (mummy) उत्खनन करताना संशोधकास सापडले होते व त्या प्रेताच्या तपासणीत दिसून आले की या राजाला देहान्तर्गत अनेक गळवे झालेली होती [1]

रोजमेरीचे हे प्रयोग १९३० पासून बरीच वर्षे चालू होते नोना म्हणे की रोजमेरी ही माझ्याबरोबर ईजिप्त देशात त्या प्राचीन काळी रहात होती व तिचे नाव व्होला होते आरभी ही गोष्ट रोजमेरीला तिच्या जागृत स्थितीत जेव्हा सांगण्यात आली तेव्हा ती तिला बिलकुल पटेना, पण प्रयोगाचा कार्यक्रम चालू होताच कालगत्या हळू हळू रोजमेरीला त्या पूर्वजन्माची आठवण येऊ लागली व त्या विमनस्क अवस्थेत

---

१ पृ १०१ वर ग्रथकार म्हणतात— Prof. Elliot Smith discovered in his mummy (fortunately preserved) traces of untended abscesses.

जाऊन ती आपल्या आठवणी लिहू व बोलू लागली त्या जुन्या-काळी नोना कशी दिसे व कशी वागे, तेथील देवळे कोणत्या प्रकारची असत, देवळात कोणत्या प्रकारचे समारभ केले जात, थोब्स शहर कसे होते, नाईल नदी व नदीसभोवारची वनश्री किती शोभिवत दिसे वगैरे गोष्टीच्या विस्तृत व तपशीलवार आठवणी तिच्या जाणिवेत पुढे डोकावू लागल्या या आठवणीची सविस्तर टिपणे ह्या ग्रथकारानी केली असून ईजिप्तमधील उत्खननाशी त्यातल्या अनेक गोष्टी जुळतात असे त्याना आढळून आले आहे

व्होला ही त्या काळी एका देवळात नर्तकीचे काम करीत होती, हे वर आलेच आहे त्या वेळची आठवण जेव्हा तिला येई तेव्हा ती ईजिप्तमधील गायनाच्या चिजा सुरावर म्हणू लागे प्रयोग चालू असताना खुर्चीवर विमनस्क स्थितीत शात बसलेली रोजमेरी एकदम माना हलवू लागे, व त्या जुन्या काळाशी कधी कधी इतकी समरस होई की आपण ईजिप्तमध्येच आहो अशा भावनेने खुर्चीवरून उठून ते नृत्य मोठ्या सफाईने करून दाखविल्याशिवाय तिच्याने रहावत नसे ! ! !

## अलेक्झँड्रिना

प्राचीन काळची ही उदाहरणे सोडून आपण आता अर्वाचीन काळच्या एका प्रसिद्ध उदाहरणाकडे वळू

सिसिली बेटातील पॅलर्मो शहरी डॉ कार्मेलो समोना नावाचे एक प्रसिद्ध डॉक्टर होते. त्याची पाच वर्षाची अलेक्झँड्रिना नावाची मुलगी मेनिन्जायटीसच्या रोगाने १९१० साली मार्च-च्या १५ तारखेस वारली [१] आईचा त्या मुलीवर विशेष जीव होता व मुलगी वारल्यामुळे आईला प्राणातिक दुःख झाले. मृत्यू-नतर तीन दिवसानी मुलगी आईच्या स्वप्नात आली आणि म्हणाली, "आई, तू रडू नको मी पुन लहान होऊन तुझ्याजवळ

---

१ ही माहिती राल्फ शिर्लेकृत The Problem of Rebirth या पुस्तकातून आम्ही घेतली आहे. या पुस्तकात या गोष्टीचे अधिकृत कागद-

येणार आहे" पुन तीन दिवसानी आईला तेच स्वप्न पडले [1] पण आईला ही स्वप्ने सारी झूट वाटली पूर्वीच्या बाळतपणात आईवर शस्त्रक्रिया करावी लागली होती व आपणाला आता मूल होणे शक्य नाही असे तिला वाटत असल्यामुळे त्या स्वप्नावर तिचा बिलकुल विश्वास बसेना पुढे आईबापानी तिवईचे प्रयोग सुरू केले, आणि त्या प्रयोगात ही अलेक्झॅड्रिना मुलगी व बरेच वर्षापूर्वी मृत झालेली डॉ सॅमोना याची वहीण अशा दोघाचे सदेश येऊ लागले

मुलीचा सदेश आईला आला की "तुझ्या स्वप्नात खरोखरीच मी आले होते आई, तू आता यापुढे रडत बसू नको येत्या खिस्टमसच्या अगोदर मी तुझे जवळ येईन आणि पुन त माझी आई होशील." तिवईच्या प्रयोगातील दर बैठकीत "मी पुनः आईच्या पोटी येणार आहे" असा सदेश ती मुलगी देई. एप्रिल १० तारखेचे सुमारास आईला वाटू लागले की आपणाला दिवस गेले असावे ता ४ मेला जेव्हा प्रयोग करण्यात आला तेव्हा मुलीने सदेश सागितला "आई तुझ्या पोटात आणखी एक मूल आहे" डॉ सॅमोनाच्या वहिणीने सागितले, "मुलीचे म्हणणे बरोबर आहे पृथ्वीवर जन्म घेण्याची इच्छा असणारी आणखी एक व्यक्ति तुमचेजवळ आलेली आहे" प्रारभापासून आईची श्रद्धा या गोष्टीवर बसेना तिची प्रकृति फार नाजूक झालेली होती, व प्रकृतिमानाचा विचार करता गर्भपात होण्याचाच बराच सभव तिला व इतराना वाटत होता तसेच त्याच्या पूर्वपिढीत जुळी मुले झाल्याची उदाहरणे बिलकुल नव्हती. ह्या व इतर अनेक कारणामुळे आईचा ह्या स्वप्नांवर व सदेशावर बिलकुल विश्वास बसेना पाचव्या महिन्यात डॉ व्हिन्सेट कोरडारो या प्रसिद्ध स्त्रीरोगचिकित्सक

१ अशा प्रकारचे स्वप्न ता १२–१०–५३ रोजी आपल्या बहिणीस पडून ती लगेच प्रसूत होऊन कन्या झाल्याची माहिती पुरुषार्थ मासिकाच्या डिसेंबर १९५३ च्या अकात मुबईचे डॉ श्री शा अजगावकर यानी दिली आहे डॉ अजगावकराची मृत पत्नी बहिणीच्या पोटी जन्म घेऊन येणार असा स्वप्नाचा अभिप्राय होता ही जन्मलेली कन्या मृत पत्नीचे गुणधर्म प्रकट कितपत करते याचा पडताळा मिळण्यास अद्याप अवकाश आहे

डॉक्टरला तिची प्रकृति दाखविण्यात आली तो म्हणाला, " मला आजच नक्की सागता येत नाही पण जुळी मुले होण्याची काही चिन्हे मला दिसत आहेत " ते ऐकून आईला थोडा फार विश्वास वाटू लागला व तिचे व्यथित मन किंचितसे हलके झाले नतर आणखी एक महिन्यात पॅलर्मोचे डॉ गिग्लिओ यानी तपासून नक्की सागितले की पोटात दोन जुळी मुले आहेत पुढे तारीख २२ नवबरला डॉ मॅमोनाच्या बायकोला दोन जुळ्या मुली झाल्या आणि सदेशाचा व स्वप्नाचा खरेपणा कसास लागला

दोन मुलीपैकी एक मुलगी मृत अलेक्झॅड्रिनासारखी दिसत असल्यामुळे तिचे नाव आईबापानी अलेक्झॅड्रिना असेच पुन ठेविले दुसरी मुलगी अगदी वेगळी दिसत होती या नव्या व जुन्या अलेक्झॅड्रिनामध्ये आणखीही साम्य होते जुनी सारखी ही नवी अलेक्झॅड्रिनाही डावरी होती दोघाचे स्वभाव व आवडीनावडीही सारख्याच होत्या जुनीला डाव्या डोळ्याची लाली (hyperemia), उजव्या कानाचा थोडासा सब–बोरिया (Sub–borrhaea) चा रोग व चेहेऱ्याची थोडीशी विषमता (asymmetry) ह्या गोष्टी होत्या व नवीमध्येही ते विशेष दिसू लागले

दोन वर्षे गेल्यावर त्या दोन जुळ्या मुलीतील फरक अधिक स्पष्ट झाले आणि नवीन अलेक्झॅड्रिना जुन्या अलेक्झॅड्रिनाच्या वळणावर अधिक अधिक प्रमाणात जाऊ लागली जुनीला चीज् हा पदार्थ आवडत नसे, नवीलाही चीज् आवडेना जुनीला पायमोजे घेऊन त्याच्याशी पुष्कळ वेळ खेळत बसण्याची आवड होती. नवीमध्येही ती आवड उत्पन्न झाली आपल्या जवळच्या नातलगाची नावे वेडीविद्री करून त्या नावाने थट्टेने त्यास हाक मारणे—एजलिनाला एजलोना असे बुद्ध्या म्हणणे—ही टवाळपणाची खोड जुन्या अलेक्झॅड्रिनाला होती व नवीच्याही स्वभावात ती प्रकट झाली

पुढे ह्या जुळ्या बहिणी दहा वर्षांच्या झाल्यावर आई त्याना पाहता म्हणाली " मॉन्ट्रीयल येथे जाऊन तेथील देऊळ

्म्हास दाखविण्याचें मी ठरविले आहे तेथे गेल्यावर तुम्हाला शा गमती पहावयास मिळतील की ज्या पूर्वी कधीही तुमच्या ष्टीस पडलेल्या नाहीत " ते ऐकून नवीन अलेक्झॉड्रिनाने उत्तर केले, " मला मॉनरीअलचे ठिकाण माहिती आहे मी ते र्वीच पाहिले आहे " आईला त्या बोलण्याचा अर्थ समजेना कारण या मुलीला त्या ठिकाणी कधीच कोणी नेलेले नव्हते व्हा मुलगी म्हणाली, " तुला, आई, आठवत नाही का की, थे एक मोठे देऊळ आहे त्याच्या छपरावर दोन हात पसरलेला एका माणसाचा मोठा पुतळा आहे कपाळावर टेंगळ असलेल्या एका बाईबरोबर आपण त्या गावाला जाऊन ते देऊळ पाहिले, आणि तांबडे आंगरखे घातलेले देवळातले भिक्षुक आपल्या दृष्टीस पडले, याची तुला आठवण नाही का ? " तेव्हा आईच्या डोक्यात प्रकाश पडला आणि जुन्या अलेक्झॉड्रिनाला आपण त्या गावी नेले होते आणि ते देऊळ, तो पुतळा व ते भिक्षुक तिने त्या वेळी पाहिले होते याची आईला आठवण आली [1]

---

१ पूर्वजन्मीच्या आठवणीची जास्त उदाहरणे देण्यास या पुस्तकात अवकाश नाही प्रस्तुत लेखकाने धर्मजागृति नावाचे एक मासिक चालविले होते त्यात (स १९२६ सप्टबर अक) एक उदाहरण आलेले आहे The Problem of Rebirth by Ralph Shirley या पुस्तकातील काही उदाहरणे वाचनीय आहेत लेडबीटरकृत The Other Side of Death (१९२८ ची आवृत्ति) या पुस्तकात ७९३ ते ८०९ पृष्ठावर काही उदाहरणे आहेत E D Walker कृत Re-incarnation या जुन्या पुस्तकात (१९०१) पृ ३७–३८ वर उदाहरणे आहेत The Memory of Past Births by Charles Johnstone या ग्रथकाराने पूर्वजन्मीची आठवण असणारी माणसे मी पाहिली आहेत, असा स्वत चा अनुभव दिला आहे Pre-Existence and Reincarnation ह्या Lutoslavski या पोलिश लेखकाच्या पुस्तकात पृ ५८ वर पुढील फ्रेंच ग्रथ नमूद आहेत —

(टीप पुढील पानावर चालू)

## लोकांची अनास्था

मागील प्रकरणात व या प्रकरणात दिलेल्या प्रकारची आणखीही उदाहरणे देता येतील. पण सध्या इतकीच पुरेत आम्ही दिलेल्यापैकी काही उदाहरणे एका जन्मानतर लवकरच दुसरा जन्म घेतल्याची आहेत अशा प्रकारचे जन्म अपवादक असतात पण जरी सामान्यत माणसाच्या दोन जन्मात बऱ्याच वर्षांचे अतर असले तरी पृथ्वीवरील कोटयवधि लोकसख्येचा हिशेव जमेस धरल्यास मध्ये फारसे अतर न जाता होणाऱ्या जन्माची सख्या अगदीच लहान भरेल असे नाही दोन जन्मात बराच काळ गेल्यास पूर्वजन्मीची आठवण रहाणे बिकट होईल व मध्यतरी फारसा वेळ गेला नसल्यास ती आठवण होणे सुलभ जाईल हे उघड आहे.

यावरून विचार केल्यास आमच्या वाचकाच्या सहज ध्यानात येईल की, आपणास ऐकू येतात त्यापेक्षा पूर्वजन्मस्मृतीची जास्त उदाहरणे आपणास सापडावयास हवीत तितकी जास्त उदाहरणे का सापडत नाहीत ? पूर्वजन्म-स्मृतीचे उदाहरण सापडणे म्हणजे जवळ जवळ कपिलाषष्ठीच्या योगाइतके दुर्घट आहे असे आपणास का वाटावे ? असले प्रश्न आमच्या वाचकांच्या मनासमोर येण्याचा सभव आहे त्यास उत्तर असे आहे की, असल्या उदाहरणाचा आपण पद्धतशीर रीतीने शोध केला पाहिजे त्याचे अगत्य जगातील सुशिक्षित लोकास सध्या वाटत नाही. अशा

(टीप मागील पानावरून)

(1) Charles Lancelin कृत La Vie Posthume, Paris (1902) (२) Gabriel Delanne कृत Documents pour Servir a l'Etude de la Reincarnation (3) Pierre Cormiller कृत La Survivance de l'Ame (Paris 1921) व (4) La Prediction de l'Avenir (Paris 1926) या सर्वात असली उदाहरणे आहेत व शेवटच्या दोन ग्रथातली उदाहरणे मेस्मेरिझममधील आहेत असे Lutoslavski लिहितो

प्रकारच्या पुराव्याने पुनर्जन्माचे सत्यत्व उत्कृष्ट प्रकारे सिद्ध करता येईल ही त्यास कल्पना नाही, व कल्पना असली तरी त्या गोष्टीची त्याना आस्था वाटत नाही जशी सुशिक्षित लोकाना आस्था नाही तशी शास्त्रज्ञानाही नाही खरोखरी मानसशास्त्राचा हा विषय आहे, पण कोणत्याही अधिकारी मानसशास्त्रज्ञाने या गोष्टीत अद्यापि फारसे मन घातले नाही असल्या गोष्टीचे सशोधन जो शास्त्रज्ञ करील त्याला इतर शास्त्रज्ञ हसण्याचा सभव आहे, व जसे इतर लोकाना सामान्यत धैर्य नसते तसे शास्त्रज्ञानाही ते प्राय नसते, आणि त्यामुळे या दिशेने पुरावा गोळा करण्याच्या बाबतीत सर्व जगभर फार अनास्था असल्यामुळे जास्त उदाहरणे उपलब्ध होत नाहीत हे दुर्दैव आहे नाहीपेक्षा असल्या प्रकारचा पुरावा नीट गोळा झाला तर तो इतका निर्णायक होईल की त्या पुराव्यावरच पुनर्जन्माचा सिद्धान्त ठाम होऊ शकेल.

सायकिकल रिसर्च सोसायटी नावाची एक सस्था विलायतेत व अमेरिकेत असून चमत्कारिक गोष्टीचे सशोधन करणे हे तिचे काम आहे. त्या सोसायटीत काही अत्यत बुद्धिमान् शास्त्रज्ञानी पुढाकार घेतलेला आहे तसेच युरोपखडातील इतर देशात काही श्रेष्ठ प्रतीचे शास्त्रज्ञ असल्या चमत्काराचे सशोधन करीत आहेत पण एकदरीने पहाता असल्या शास्त्रज्ञाची सख्या असावी त्या मानाने फार लहान आहे असल्या गोष्टीत मन घालण्याची आजच्या युगातल्या बुद्धिमान् लोकास हौसच वाटत नाही जे थोडेसे कुशाग्रबुद्धीचे शास्त्रज्ञ या उद्योगात पडतात त्याची इतर शास्त्रज्ञानी व सामान्य जनतेने हेटाळणी करावी अशी जगाची सध्याच्या काळी वृत्ति आहे. त्यातल्या त्यांत दुर्दैवाची गोष्ट अशी की असल्या पूर्वजन्मस्मृतीच्या उदाहरणाकडे सायकिकल रिसर्च सोसायटीचेही फारसे लक्ष गेलेले दिसत नाही.

पुनर्जन्माच्या सिद्धातासबधी अत्यत उच्च प्रतीचा पुरावा गोळा होण्यासारखा असूनही सध्याची स्थिति अशा प्रकारे शोचनीय झालेली आहे सामान्य माणसापेक्षा शास्त्रज्ञ असल्या

उद्योगात पडले तर सशोधन जास्त विश्वसनीय होते, आणि त्यात चुका राहण्याचा सभव कमी रहातो स्मरणशक्तीविषयीच्या प्रश्नात मानसशास्त्रज्ञ पडले तर इतर बुद्धिमान् माणसापेक्षा त्याचे सशोधन अधिक चागल्या प्रतीचे होईल हे उघड आहे स्मरण-शक्तीचा प्रश्न दिसतो तितका सोपा नाही एकाद्यास एकाद्या विलक्षण गोष्टीचे स्मरण झाले तर ते स्मरणच आहे की दुसऱ्या एखाद्या माणसाच्या मनातले विचार त्याच्या मनात प्रतिबिंबित होऊन तसला प्रकार अस्तित्वात आला आहे हे ठरवणे जरूर असते त्याचे विवेचन मानसशास्त्रज्ञाला जसे करता येईल तसे इतराना करता येणार नाही एका माणसाच्या मनातले विचार दुसऱ्याच्या मनात कधी कधी सहजासहजी प्रकट होतात ही गोष्ट आज अनेक शास्त्रज्ञास मान्य झालेली आहे तसेच माणसाच्या अतर्मनात अद्‌भुत शक्ति आहेत व त्या मनाला दूरच्या गोष्टी समजू शकतात ही गोष्ट अनेकाना आज मान्य झालेली आहे पूर्वजन्माची आठवण ज्या माणसाना आहे असे आपणास वाटते ती खरोखरची आठवण आहे, त्यात दुसऱ्याचे विचार प्रकट होण्याचा प्रश्न गुतलेला नाही, किंवा माणसाने अलौकिक शक्तीचा उपयोग करून अन्य ठिकाणच्या गोष्टी पहाण्याचाही भाग त्यात नाही, अशी खात्री जेव्हा होईल तेव्हाच पुनर्जन्माच्या अस्तित्वा-सबधाने सर्व सशय फिटतील हे उघड आहे अर्थात् हे काम शास्त्रज्ञाचे आहे, सामान्य माणसाचे नाही हे कोणासही सागण्यास नको, आणि शास्त्रज्ञ तर आज बहुतेक सारे दुराग्रहपीडित अथवा उदासीन आहेत !

पूर्वजन्मीची आठवण लहान मुलाना कधी कधी असते पण त्या मुलाचे वय जास्त होऊ लागले म्हणजे ती आठवण पुसट होऊ लागते व सरतेशेवटी साफ बुजून जाते असे अनेक उदा-हरणात दिसून आलेले आहे माणसाला मेस्मेरिझमच्या निद्रेत घातले म्हणजे त्या स्थितीत त्याची स्मरणशक्ति अधिक कुशाग्र करता येते असा अनुभव आहे वरीलसारखी उदाहरणे जर मेस्मेरिझमचे शास्त्र अवगत असलेल्या शास्त्रज्ञानी तपासली तर

त्यास त्या मुलाची स्मृति जागृत करता येईल, व पुष्कळच जास्त गोष्टीचा पडताळा पहाण्याची संधि शास्त्रज्ञाना मिळेल पुनर्जन्माचा सिद्धान्त जर शास्त्रीय प्रयोगाच्या जोरावर निस्सदिग्ध रीतीने सिद्ध करावयाचा असला तर तो ह्या मार्गाने सिद्ध होऊ शकेल असे आम्हास वाटते. पण अशा तऱ्हेचे प्रयोग शास्त्रज्ञानी अद्याप फारसे केलेले नाहीत, ही खेदाची गोष्ट आहे

## डी रोशा यांचे प्रयोग

ज्या मुलाला अशा पूर्वजन्मीची स्मृति अगोदरच आलेली असेल त्याच्यावर मेस्मेरिझमचे प्रयोग केले तरच ते विशेष यशस्वी होतील हे उघड आहे सामान्य माणसावर ते केले तर ते तितके यशस्वी होण्याचा सभव नाही डी रोशा या फ्रेंच गृहस्थाने असले काही प्रयोग केले आहेत, व माणसाची स्मृति जागृत करून पाहिली आहे त्या प्रयोगाचा पुनर्जन्माच्या सिद्धान्तास दुजोरा मिळत आहे त्याचे सक्षिप्त वर्णन या प्रकरणात देऊन ते पुरे करू या ज्या मुलास अगोदरच पूर्वजन्माची आठवण आहे अशा मुलावर त्यानी प्रयोग केलेले नाहीत तशी मुले त्याना मिळाली नसावी असे वाटते.

कर्नल रोशा[१] हे हस्तविक्षेप करून माणसाला मेस्मेरिझमच्या निद्रत नेतात तो प्रयुक्त ( ज्या माणसावर प्रयोग चालू असतो तो ) निद्रावश झाला म्हणजे त्याला ते काळाच्या ओघाने मागे नेतात आणि योग्य त्या आज्ञा करून त्याची पूर्वीची स्मृति जागृत करतात उदाहरणार्थ प्रयुक्त अठरा वर्षाचा असला तर

१ कर्नल डी रोशा याच्या प्रयोगाची सक्षिप्त हकीकत प्रस्तुत ग्रथकाराच्या मेस्मेरिझम् नावाच्या पुस्तकात पृ ९४ वर आहे डी रोशा यानी Les Vies Successives नावाचे पुस्तक फ्रेंच भाषेत लिहिलेले आहे. त्यातील माहिती Proofs of the Spirit World by L Chevreul या पुस्तकात प्रकरण ४ मध्ये साराशरूपाने आली आहे. येथील वर्णन त्या प्रकरणाच्या आधारे आम्ही लिहिलेले आहे

तू सतरा वर्षांचा आहेस अशी ते त्याला आज्ञा करतात म्हणजे तो सतरा वर्षांचा असताना जसा होता, तसा वागू लागतो, त्या वेळची त्याची आठवण जागृत होते, व नंतरची बुजून जाते मग त्याला आज्ञा करतात की तू सोळा वर्षांचा आहेस, नंतर पंधरा वर्षांचा आहेस अशी आज्ञा करतात व क्रमाने असेच मागे मागे त्याला नेतात अशा रीतीने एका मुलीवर रोशा यांनी प्रयोग केले व तू दहा वर्षांची आहेस अशी तिला आज्ञा केली ती दहा वर्षांची असताना मार्सेल्स शहरी होती व ही गोष्ट रोशा यांना माहीत नव्हती पण ती आज्ञा केल्यावर ती मुलगी मार्सेल्स-मध्ये असल्याचे बोलू लागली पुढे तू आठ वर्षांची आहेस अशी आज्ञा केली त्या वयात ती बेयरूट शहरी होती आणि तशी आज्ञा केल्यावर त्या शहरी असल्यासारखे करून त्या काळी जी माणसे तिच्या घरी येत त्यांची ती आठवण काढू लागली त्या शहराची तुर्की भाषा त्या मुलीला जागृत स्थितीत आठवत नव्हती पण मेस्मेरिझम्च्या निद्रेत गुड्मॉर्निंग शब्दाला सलाम अलेकुम् म्हणतात हे ती सांगू शकली पुढे तिला क्रमाने दोन वर्षांची करण्यात आली तेव्हा मी क्यूग येथे आहे असे ती म्हणू लागली व ते खरे होते पुढे तिला आज्ञेने एक वर्षाची करण्यात आले तेव्हा तिला बोलता येईना व माना हलवून ती नाही होय सांगू लागली अशा प्रकारचे रोशा यांनी अनेक माणसांवर प्रयोग केले व त्या प्रयुक्तांची आठवण कालाच्या ओघाने क्रमाने त्यांनी पाठीमागे नेली व ती आठवण पाठीमागे जात असताना ती खरी आहे याचा पडताळा घेतला अशा रीतीने प्रयुक्ताला जन्मापाशी नेले की तो माणूस मी आईच्या पोटात आहे असे सांगू लागतो त्याच्या पाठीमागे त्याला नेले म्हणजे मी हवेत गोळ्यासारखा तरंगत आहे व अमुक अमुक आईच्या उदरात शिरणार आहे असे सांगतो त्याच्याही पाठीमागे त्याला नेले म्हणजे काही काळ नुसता स्वस्थ पणाचा जातो त्याच्यामागे नेल्यास मी एक म्हातारा माणूस असून मरणोन्मुख आहे, अशी हकीकत सांगतो आणखी पाठीमागे आणल्यास तो माणूस तरुण व लहान होत होत पुन जन्मापाशी

येतो. अशा रीतीचे हे प्रयोग आहेत माणसाची स्मृति जागृत करून ती प्रस्तुत जन्मात मागे न्यावयाची, तसे होत असताना ती आठवण खरी व विश्वसनीय आहे याची प्रचीति पहावयाची व मग क्रमाने प्रस्तुत जन्माच्या पुष्कळच पाठीमागे जावयाचे असे केले की मी एक दुसराच्च माणूम आहे असे तो मागतो अर्थात् हा त्या माणसाचा पूर्वीचा जन्म होय त्याही जन्मात पुन पाठी-मागे स्मृति नेली की मी आणखी निराळाच एक माणूस आहे असे तो म्हणू लागतो हा अर्थातच त्याच्या मागचा जन्म होय असे म्हणावे लागते

हे प्रयोग अत्यत महत्त्वाचे आहेत व पुढे मागे या दिशेने प्रयत्न केल्यास पुनर्जन्माविषयी खात्रीलायक पुरावा मिळू शकेल असे आम्हास वाटते हे प्रयोग सर्वस्वी निर्दोष आहेत व त्याच्यावरून पुनर्जन्मवाद आज नि मदिग्ध रीतीने सिद्ध झालेला आहे असे आम्ही म्हणत नाही प्रयुक्ताच्या मनात प्रयोग करणाऱ्याचे विचार प्रतिबिंबित होतात असा मेस्मेरिझमच्या शास्त्रातला अनुभव आहे. तेव्हा रोशा याची मते प्रयुक्ताच्या मनात उद्भवून त्याच्या आठवणीत कमी अधिक होण्याचा सभव आहे, हे नाकबूल करता येत नाही तसेच मेस्मेरिझमच्या निद्रेत माणसाचे मन नाजूक व हळुवार असते, त्याच्यावर वाटेल तो खराखोटा ठसा उमटण्याचा फार सभव असतो हेही ध्यानात आणणें जरूर आहे तसेच प्रयुक्ताने पूर्वीच्या जन्माची जी माहिती सांगितली ती खरी आहे की नाही त्याचा पडताळाही पहाणे अवश्य आहे पण फार जुन्या गोष्टीविषयी तसे करणे बरेच बिकट असते या सर्व कारणावरून वरील प्रयोग अगदी निर्णायक आहेत असे आजच म्हणता येणार नाही, हे खरे पण जेथपर्यंत आठवणीचा पडताळा पाहता येतो तेथपर्यंत ती खरी असल्याची जर प्रचीति येत आहे, तर त्या मर्यादेच्या पलीकडे गेल्यावर ती आठवण विश्वसनीय मानली पाहिजे, हेही नाका-रता येत नाही अर्थात् या दिशेने आणखी पुष्कळच प्रयोग झाले तर सरतेशेवटी पुनर्जन्माचा प्रश्न पूर्णपणे धसास लागेल व पुन-

जन्म हे एक शास्त्रीय आणि प्रयोगसिद्ध तत्त्व गणण्यांत येईल असे आम्हास वाटते.[१]

रोशा यानी अशा रीतीने मिळविलेला पुरावा किती महत्त्वाचा आहे ते पुढील उदाहरणावरून समजेल त्यानी एका एकोणचाळीस वर्षाच्या स्त्रीवर हे प्रयोग केले, व एका पाठीमागचे एक असे अकरा जन्म तपासले प्रस्तुतचा जन्म हा पहिला जन्म त्याचा मागचा दुसरा जन्म अशी गणना आपण येथे करू या दुसऱ्या जन्मी आपण ज्या गावी व ज्या शाळेत होतो ती नावे व शाळेच्या मालकाचे नाव ही तिने सागितली व ती सारी जमली त्याच्या मागच्या म्हणजे तिसऱ्या जन्मात आपण पूर्वीच्याच गावी जन्मलो असल्याचें तिने सागितले त्याच्याही मागच्या म्हणजे चवथ्या जन्मात ती प्लोअरमेल येथे होती पाचव्यात ती सैनिक (पुरुष) होती व इ स १५१५ साली भाला लागून वारली त्या वेळच्या राजाचे नाव तिने बरोबर सागितले. सहाव्या जन्मातील राजाचे नाव तिने भलते सागितले सातव्या जन्मात ती पुष्कळ वर्षे जगली त्या अवधीत ९४७–१०१० तोन राजे झाले त्याची नावे तिने बरोबर सागितली. आठव्यात (इ स ४४९ च्या सुमारास) तिला युद्धात ॲटिलाने धरून नेले होते असे सागितले व ते साल ॲटिलाच्या इतिहासाशी जुळते असे आढळले नवव्यात प्रोबस राजाचा रखवालदार मी होते असे सागून त्या जन्मातले एक वर्ष तिने २७९ असे दिले त्या वेळी तो राजा राज्य करीत होता असे इतिहासावरून दिसते वरील हकीकतीवरून या प्रयोगाचे महत्त्व वाचकाच्या ध्यानात येईल

१ या प्रकरणात निरिया व बोवा याचा पूर्वीचा जन्म दोन तीन हजार वर्षापूर्वी झाल्याचे दिसते कदाचित् मध्यतरी काही जन्म झालेले असतील ते अगदी कमी महत्त्वाचे असतील व म्हणून त्याची आठवण बुजून गेलेली असणे अशक्य नाही

प्रकरण ८ वे

# ज्ञानी पुरुष व पूर्वजन्माची स्मृति

सहजासहजी पूर्वजन्मीची आठवण ज्याना आहे किंवा कृत्रिम साधनानी ज्याची ती आठवण प्रयोगासाठी जागृत केलेली आहे, अशा उदाहरणाचा विचार आम्ही पूर्वीच्या प्रकरणात केला आहे ती उदाहरणे सामान्य प्रतीच्या माणसाचीच आहेत या प्रकरणात पूर्वजन्मीच्या आठवणीचा आपणास अधिक विचार करावयाचा आहे पण जी उदाहरणे आपणास पहावयाची आहेत ती विशेष योग्यतेच्या माणसाची घेण्याचा आमचा सकल्प आहे जे लोक तत्त्ववेत्ते म्हणून, धर्मगुरु म्हणून, योगी म्हणून, साधुसत म्हणून, जगात प्रसिद्ध आहेत, त्याची उदाहरणे आपण या प्रकरणात विचारात घेणार आहो

त्या उदाहरणाच्या विवेचनास सुरवात करण्यापूर्वी सुबुद्ध व सुशिक्षित माणसास कधी कधी चमत्कारिक भावना उत्पन्न झाल्याचा जो अनुभव वाटतो त्याचा उल्लेख येथे करणे जरूर आहे पुष्कळ सुबुद्ध माणसाना एकाद्या ठिकाणी गेले असता ही जागा आपल्या पूर्वपरिचयाची आहे असे अधुक अधुक वाटते आपण एकाद्या माणसास पाहिले असता आपली त्याची ओळख आहे असा आपणास भास होतो. दोन माणसे एकमेकाशेजारी पाचदहा वर्षे राहिली असली तरीही कधी कधी त्याना एकमेकाबद्दल तितकीशी ओढ वाटत नाही, पण एकादा दूरचा माणूस आपणाला सहजासहजी भेटतो, तो आपल्या ओळखीचाच जणू आहे अशा बुद्धीने आपण त्याच्यापाशी अगदी सलगीने पहिल्याच भेटीच्या

वेळी वागतो, आणि लवकरच आपली व त्याची दाट ओळख होऊन एकाद्या वेळी जन्मभर आपणास त्याचे अगत्य वाटत रहाते एकादा इतिहासातला प्रसग आपण वाचला तर तो प्रसग परका वाटत नाही, आपला त्याशी काही ऋणानुबध आहे अशी मनाची भावना होते एकादा जुना किल्ला, एकादे जुने क्षेत्र आपण पाहिले, एकाद्या वाटेने चालत किवा प्रवास करीत असलो तर आपण या ठिकाणी केव्हा तरी पूर्वी आलो होतो अशी पुसट पुसट कल्पना आपणाला आपले मन देत असते आमच्या वाचकापैकी अनेकाना असल्या आभासाची प्रचीति असेल हे आभास कोठून येतात ? त्या गोष्टीचा, माणसांचा वा परिस्थितीचा आपणाला पूर्वजन्मी दाट परिचय झालेला असेल व त्या आठवणीची अस्पष्ट छाया प्रस्तुत जन्मी आपल्या मनावर पडत असेल नाही कोणी म्हणावे ? कवीनी तसे आपले मत दिले आहे श्रीरामचद्राचा पूर्वीचा एक अवतार वामनाचा होता, वामनावतारी परिचित असलेल्या आश्रमात जेव्हा श्रीरामचद्र गेले त्या वेळी "उन्मनाः प्रथमजन्मचेष्टितान्यस्मरन्नपि बभूव राघव ।" असे कालिदासाने म्हटले आहे.[१] पूर्वजन्माचे स्पष्ट स्मरण रामचद्राना नव्हते, तरीही त्या ठिकाणी गेल्यावर त्याच्या मनात कालवाकालव झाली असा कालिदासाच्या म्हणण्याचा आशय आहे कालिदासाने शाकुतल नाटकातही असे म्हटले आहे की एकादे रम्य दृश्य पाहून किवा सुस्वर आलाप ऐकून कधी कधी माणसाच्या हृदयात विलक्षण प्रकारचे उत्सुकतेचे तरग उठत असतात, त्या वेळी जरी माणसाला पूर्वजन्मीची नीट आठवण होत नसली तरी त्या लाटा पूर्वजन्मीच्या ऋणानुबधानीच उत्पन्न केलेल्या असतात[२] नक्की असे होत असेलच असे म्हणण्याजोगा पुरावा आपणापाशी नाही हे खरे पण तसे होणे बिलकुल असभाव्य नाही हे आपण विसरता कामा नये अधुक आठ-

१ रघुवश सर्ग ११, श्लोक २२

२ रम्याणि वीक्ष्य मधुराश्च निशम्य शब्दान् । पर्युत्सुकीभवति यत्सुखितोऽपि जन्तु । तच्चेतमा स्मरति नूनमबोधपूर्वम् । भावस्थिराणि जननातरसौहृदानि ।। अक ५ श्लोक २

वणीची पायरी अलीकडची व स्पष्ट आठवणीची पलीकडची, असे असणे साहजिक आहे चालू प्रकरणात आपणाला जी उदाहरणे पहावयाची आहेत ती असल्या अंधुक आठवणीची नसून स्पष्ट अशा स्मृतीची असणार आहेत असली स्पष्ट आठवण उत्पन्न करण्याची काही तरी रीत आहे हे दर्शविणारे पुष्कळ उल्लेख जुन्या सस्कृत वाङमयात आहेत पण तो योगाचा विषय असल्याने आणि योग-शास्त्रातल्या पद्धति सर्वांसमोर स्पष्टपणे माडण्याची वहिवाट नसल्यामुळे ती रीत कोणती ते सपूर्णपणे ध्यानात येण्यास साधन नाही वाङमयात सापडणारे उल्लेख इतके विपुल व व्यवस्थित नाहीत की त्यावरून आपणाला पूर्वजन्माची आठवण उत्पन्न करण्याचा तो मार्ग तपशीलवार व सागोपाग रीतीने वर्णन करता येईल [१] छान्दोग्य उपनिषदात 'आहारशुद्धौ सत्त्वशुद्धि' 'सत्त्वशुद्धौ ध्रुवा-स्मृति ।' असे म्हटले आहे [२] आहार शुद्ध असावा त्याने आठ-वण जास्त तीव्र होते असा त्या म्हणण्याचा अर्थ आहे पातजल योगशास्त्रात 'अपरिग्रहस्थैर्ये जन्मकथता सबोध ।' असे सूत्र आहे [३] अपरिग्रह म्हणजे कोणत्याही गोष्टीचा सग्रह करण्याची आसक्ति नसणे अर्थात् जर आसक्ति नाहीशी झाली तर पूर्वजन्मात मी कोण होतो, कसा होतो याचा सबोध होतो, अर्थात् अनुभव येतो अशी सूत्राची शिकवण आहे त्याच सूत्रग्रथात दुसरीकडे पत-जलीनी "निरोधपरिणाम" "समाधिपरिणाम" व "एकाग्रता परिणाम" असे तीन परिणाम सागितले आहेत व नतर "परि-णामत्रयसयमादतीतानागतज्ञानम् ।" असे म्हटले आहे [४] म्हणजे या तिन्ही परिणामात सयम केल्याने भूत व भविष्यकाळच्या गोष्टीचे ज्ञान होते तसेच त्यानी 'सस्कारसाक्षात्करणात् पूर्व-जातिज्ञानम् ।'[५] म्हणजे सस्काराच्या ठिकाणी चित्ताचा सयम करून सस्काराचा साक्षात्कार केल्याने पूर्वजन्मी आपण कोण होतो त्याचे ज्ञान मिळते असे सागितले आहे

१ उदाहरणादाखल फक्त काही उल्लेख येथे दिले आहेत २ छान्दोग्य अध्याय ७ खड २६ ३ पातजल सूत्रे साधनपाद, ३९ ४ किंवा, विभूति-पाद सूत्र १६ ५ किंवा विभूतिपाद सूत्र १८

वरील वचनाचा सपूर्ण अर्थ ध्यानात येणे कठिण आहे. पण पूर्वीच्या अधिकारी लोकाना पूर्वजन्म ज्ञात करून घेण्याची काही प्रक्रिया अवगत होती इतके तरी असल्या उल्लेखावरून स्पष्ट अनुमान निघते

## श्रीकृष्ण

पूर्वीच्या प्रकरणात पूर्वजन्म आठवल्याची जी उदाहरणे दिली आहेत ती सामान्य प्रतीच्या माणसाची आहेत प्रस्तुत प्रकरणात विशेष अधिकारी माणसाची उदाहरणे देण्याचा मनोदय आहे. सामान्य प्रतीच्या माणसाना स्वत च्या स्मृतीसबधाने विवेक करता येणे शक्य नसते, असा आक्षेप आमच्या वाचकास घेता येण्यासारखा आहे. हा आक्षेप त्या प्रकरणातील सर्व उदाहरणास सरसहा लागू पडेल असे मात्र नाही कारण त्या उदाहरणापैकी अनेकाचे पडताळे सापडलेले आहेत पण माणूस जेव्हा म्हणतो की मला आठवण आहे, तेव्हा ती खरोखरीच त्याची आठवण आहे की नाही ? कदाचित् ती त्याची कविकल्पना नसेल कशावरून ? दुसऱ्या एकाद्या माणसाचे विचार त्याच्या मनात प्रतिबिबित होऊन ते आपलेच विचार आहेत अशी त्याला भूल झाली नसेल कशावरून ?[1] त्या माणसाच्या अतर्मनातून एकादी वेडी प्रेरणा वर येऊन ती त्याला खरी वाटली नसेल कशावरून ? वगैरे अनेक मानसशास्त्रविषयक आक्षेप त्या लेखातील उदाहरणापैकी काही सबधाने तरी कदाचित् घेता येतील असले आक्षेप पुढील उदाहरणास लागू पडणार नाहीत हे वाचकानी लक्षात ठेवावे कारण पुढील उदाहरणे ज्ञानी व बुद्धिमान् माणसाची आहेत, ध्यान, धारणादिकाची प्रचीति असणाराची आहेत, आतर अनुभवापैकी खरा भाग किती,

---

१ टीप एका माणसाचे विचार बोलल्याशिवाय दुसऱ्याच्या मनात जातात हे अलीकडे प्रयोगानी सिद्ध झाले आहे त्याला विचार–सक्रमण किवा Telepathy असे म्हणतात Thought Transference, Extra Sensory Perception वगैरे दुसरीही अनेक नावे प्रचलित आहेत.

सोने किती व हिणकस किती, याचा विवेक असणाराची आहेत हें विसरून चालणार नाही. अर्थात त्यात भूल आहे असे म्हणण्यास जागा नाही

पहिले उदाहरण भगवान् श्रीकृष्णाचे आहे गीतेत अर्जुन श्रीकृष्णास प्रश्न विचारीत आहे, व माझ्यासमोर असलेल्या श्रीकृष्णानी फार वर्षापूर्वी अमुक अमुक योग जगाला कसा सांगितला असेल याचे त्याला कोडे पडले आहे अर्जुन प्रश्न करितो—

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।**
**कथमेतद् विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ।।**

गीता ४, ४

**अर्थ**— भगवन् ! आपला जन्म अलीकडचा आहे, विवस्वानाचा पूर्वीचा आहे तेव्हा तुम्ही हा योग प्रारंभी विवस्वानाला सांगितलात ह्या विधानाची माझ्या मनाला समजूत कशी पडणार ?

श्रीकृष्ण उत्तर देतात—

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ।।**

गीता ४, ५

**अर्थ**— अर्जुना ! तुझे व माझे पूर्वी अनेक जन्म होऊन गेलेले आहेत त्या सर्वांचे मला ज्ञान आहे पण तुला त्याचे ज्ञान नाही

येथे श्रीकृष्णानी स्वच्छ सांगितले आहे की मला माझ्या पूर्वीच्या साऱ्या जन्माचे ज्ञान आहे " अहं वेद " असे त्याचे शब्द आहेत, व ते स्पष्ट आहेत. त्यावरून श्रीकृष्ण कविकल्पना करीत नसून त्याना त्याची आठवण होती याविषयी संशय घेण्यास जागा नाही

पूर्वजन्माची आठवण होण्यास पराकोटीचा आध्यात्मिक अधिकार जरूर असतो असे मानण्याचे कारण नाही श्रीकृष्णाना जशी आपल्या पूर्वजन्माची आठवण असे तशी गौतम बुद्धानाही होती हे आम्ही लौकरच दाखविणार आहो पण त्यावरून असे

कोणी समजू नये की श्रीकृष्ण वा बुद्ध यांच्याइतकी आध्यात्मिक योग्यता अंगी असल्याशिवाय माणसाला ती आठवण होणार नाही या दोन महापुरुषाच्या मानाने पुष्कळच कमी योग्यतेच्या पण सामान्य जनाच्या मानाने बऱ्याच श्रेष्ठ प्रतीच्या सताना पूर्वजन्माची आठवण असल्याची उदाहरणे आहेत व ती या लेखात आम्ही लौकरच देणार आहो. धम्मपदाच्या शेवटल्या श्लोकात—

पुब्बे निवासं यो वेदि सग्गापायच पस्सति ।
अथो जाति क्खयं पत्तो अभिञ्ञावोसितो मुनि ।
सब्बवोसित वोसानम् तमहं ब्रूमि ब्राह्मणम् ।।

असे म्हटले आहे. या श्लोकात भगवान् बुद्ध म्हणत आहेत की, "आपल्या पूर्वजन्माचे ज्याला ज्ञान आहे, ज्याला स्वर्ग व नरक दिसतात, ज्याच्या जन्माच्या येरजाऱ्या सपल्या आहेत, जो ज्ञानाने पूर्ण असा मुनि आहे, सर्व आदर्श गुणानी जो मडित आहे, त्याला मी ब्राह्मण समजतो" या श्लोकावरून अगदी निर्णात्मक अर्थ निघत नाही, व किती अधिकार आल्यावर माणसाला पूर्वजन्म आठवतात ते नक्की स्पष्ट होत नाही, पण अमुक अमुक अधिकाराचा जो असेल तोच खरा ब्राह्मण होय असे सागण्याचा बुद्धाचा रोख आहे ज्या अर्थी त्या काळी खऱ्या ब्राह्मणाची सख्या अगदीच कमी होती, पाचदहा माणसापेक्षाही कमी होती, असे मानणे सयुक्तिक होणार नाही, त्या अर्थी बुद्ध-श्रीकृष्णाच्या मानाने बऱ्याच कमी अधिकाराच्या सताना पूर्वजन्म-स्मृति असली पाहिजे असा आमच्या मते बुद्धाच्या बोलण्याचा निष्कर्ष निघतो

## गौतमबुद्ध

गौतमबुद्धानी स्वत च्या सबधाने पुढील उद्गार भयभेरव सुत्तामध्ये काढले आहेत हे सुत्त मज्झिमनिकायात आहे. गौतमबुद्ध त्या सुत्तात जानुस्सोणि नावाच्या ब्राह्मणास आपले वृत्त कथन करीत आहेत ते म्हणतात ——

अशा रीतीने माझे चित्त जेव्हा एकाग्र, शुद्ध, पवित्र, निर्मळ, क्लेशरहित, मार्दवयुक्त, निग्रही व अचल झाले तेव्हा मी पूर्वजन्म-

स्मृतिज्ञानाकडे त्या चित्ताची योजना केली. त्या मला नाना प्रकारच्या पूर्वजन्माची स्मृति झाली कारण एक, दोन, तीन, चार असे हजारो जन्म मला आठवू लागले सवर्त कल्पातील व विवर्त कल्पातील जन्मही मला स्मरू लागले त्या अनेक जन्मात, मी अमक्या ठिकाणी होतो, अमुक नावाचा, अमुक गोत्राचा, अमुक वर्णाचा, अमुक आहार करणारा, अमकी सुखदु खे भोगणारा, अमुक आयुष्यपर्यंत जगणारा होतो, तेथून च्युत झाल्यानतर अमक्या ठिकाणी जन्मलो, तेथे मुद्धा अमुक नावाचा वगैरे, वगैरे, होतो तेथूनही च्युत झाल्यानतर ह्या ठिकाणी उत्पन्न झालो, अशा रीतीने अनेक पूर्वजन्माची त्या त्या जन्माच्या स्वरूपासकट व उद्देशासकट सर्वप्रकारची स्मृति मला झाली. जानुस्सोणि ब्राह्मणा ! आत्मदमन करून व अप्रमत्त होऊन प्रयत्न करीत असता, रात्रीच्या पहिल्या प्रहरात ही पहिली विद्या मला हस्तगत झाली, अविद्येचा नाश झाला, ज्ञानाचा उद्भव झाला आणि तम नष्ट होऊन विवेक उत्पन्न झाला [१]

---

१ माज्झिमनिकाय, भयभेरव सुत्त ५ यातील पाली भाग पुढील-प्रमाणे आहे –

"सो एव समाहिते चित्ते परिसुद्धे परियोदाते अनगणे विगतूपक्किलेसे मुदुभूते कम्मनिये ठिते अनोञ्जपत्ते पुब्बे निवासानुस्सति ञाणाय चित्त अभिनिन्नामेसि। सोह अनेकविहित पुब्बेनिवास अनुस्सरामि, सेय्यथीद एक पिजातिं द्वेपि जातियो तिस्सोपि जातियो चतस्सोपि जातियो जातिसहस्सम्पि जातिसतसहस्सम्पि अनेकेपि सवट्टकप्पे, अनेकेपि विवट्टकप्पे अमुत्रासिं एवनामो एवगोत्तो एववण्णो एवमाहारो एव सुखदुक्खपटिसवेदी एवमायुपरियन्तो, सो ततो चुतो अमुत्र उदपादिं तत्रापासिं एवनामो.

.एवमायुपरियन्तो, सो ततो चुतो इधूप पन्नो ति। इति साकार सउद्देस अनेकविहित पुब्बेनिवास अनुस्सरामि। अय खो मे ब्राह्मण रत्तिया पठमे यामे पठमा विज्जा अधिगता, अविज्जा विहता, विज्जा उप्पन्ना, तमो विहतो, आलोको उप्पन्नो, यथा त अप्पमत्तस्स आतापिनो पहितत्तस्स विहरतो।

वरील उताऱ्यावरून बुद्धाना पूर्वजन्माची आठवण होती, ती व्यवस्थित होती व ती आठवण त्यानी अभ्यासाने साध्य करून घेतली होती हे स्पष्ट आहे

नुसती बुद्धाना ती आठवण होती असे नाही तर जे बुद्ध-पदवीपर्यंत जाऊन पोहोचलेले असतात त्याना नेहमीच अशी आठवण असते असे बुद्धानी सागितलेले आहे पुढील विधान पहा--

पुन च परम् सारिपुत्त तथागतो अनेक विहितम् पुब्बे निवास-मनुस्सरति सेय्यथीदम् एक पि जाति, द्वेपि जातियो, तिस्सोपि जातियो इत्यादि

**अर्थ**-- हे सारिपुत्रा ! प्रत्येक तथागताला अनेक पूर्वजन्माची, एक-दोन-तीन-चार अशा पूर्वजन्माची आठवण असते [१]

## पायथॅगोरस्

पायथॅगोरस् नावाचा एक तत्त्ववेत्ता इसवी सनापूर्वी पाचव्या शतकात होऊन गेला इसवी सनापूर्वी जी जगात मोठी माणसे होऊन गेली त्यात पायथॅगोरस हा अग्रगण्य आहे त्याने गणित शास्त्रात शोध केलेले आहेत पृथ्वी स्थिर नसून सूर्याभोवती फिरते हा विचार त्यानेच जगाला प्रथम शिकविला या पुरुषाने इटलीच्या दक्षिण भागात एक सप्रदाय काढलेला होता त्यात वाटेल त्याला प्रवेश नसे. माणूस सद्‌गुणी व ध्येयनिष्ठ असल्या-शिवाय त्या सप्रदायात माणसाला जाता येत नसे सप्रदायात असणारानी मद्य-मास वर्ज्य केले पाहिजे, ध्यान केले पाहिजे, साधे-पणाने राहिले पाहिजे, वर्तणूक उत्तम ठेवून चित्त शुद्ध केले पाहिजे, धर्माचा अभ्यास व आचरण केले पाहिजे अशी पायथॅगोरसची शिस्त असे. या सर्व गोष्टीचा विचार केला म्हणजे आध्यात्मिक अनु-भव घेण्याकरिता हा सप्रदाय पायथॅगोरसने काढला असला पाहिजे हे वाचकाच्या सहज लक्षात येईल पुनर्जन्मवाद पायथॅगोरसनेच प्रथम पाश्चात्य लोकात प्रसृत केला हे त्याचे पुनर्जन्माविषयीचे

१ पहा महत्सीहनाद सुत्त ५

मत अनुभवावर आधारलेले होते. पायथॅगोरसला आपल्या पूर्वजन्माची सगतवार आठवण होती व इतराचे पूर्वजन्मही तो सागू शके अशी इतिहासाची साक्ष आहे. पायथॅगोरसचा एक चरित्रकार लिहितो –

पायथॅगोरस हा आपल्या सहकारी मडळीस त्याच्या पूर्वीच्या जन्मीची माहिती सागत असे ह्या देहात येण्यापूर्वी जे देह त्या माणसानी घेतलेले होते त्याविषयी स्पष्ट असे उल्लेख तो करी. त्याविषयी विवेचन करून तो इतराची खात्री करी मी मागच्या जन्मी पान्थसचा मुलगा यूफार्बस होतो व त्या जन्मी ट्रायच्या लढाईत जाऊन पॅट्रोक्लसचा पराभव केला होता, अशी त्याला आठवण होती व तो ही हकीगत आपल्या सभोवतालच्या मडळीस सागत असे त्या ग्रामाचा उल्लेख इलियड नामक काव्यात आहे व तो भाग पायथॅगोरस पुष्कळ वेळा लोकास गाऊनही दाखवी [1]

दुसरा एक चरित्रकार म्हणतो :–

पायथॅगोरसला पूर्वजन्मीची आठवण असे असे हेराक्लाईडस पॉटिकस याने लिहिले आहे. एकदा अर्गास येथे एका देवळात पायथॅगोरस गेला होता तेथे जुन्या वीराच्या ढाली लोकाच्या सस्मरणार्थ ठेविलेल्या होत्या, त्या ढालीपैकी एक ढाल ( तिच्यावरचा लेख न वाचता ) मागच्या एका जन्मी माझी होती असे पायथॅगोरसने लोकास सागितले. मी त्या जन्मी पान्थसचा मुलगा यूफार्बस होतो, व ती ढाल घेऊन ट्रायच्या युद्धात मी गेलो होतो, त्या वेळी ट्रायच्या तटाखाली ती ढाल हाती घेऊन लढत असताना मेनिलेअसच्या हातून मला मृत्यु आला अशी पायथॅगोरसनें कच्ची हकीकत सागितली यूफार्बसचा जन्म होण्याच्या अगोदर मी

१ पहा Iamblichus कृत पायथॅगोरसचे चरित्र. हे ग्रीक भाषेतून Thomas Taylor यानी इग्रजीत भाषान्तरित केले आहे. त्याची छोटी (abridged) आवृत्ति पृ. ३७ पहा.

ह्र्मीसचा मुलगा ईथलायडीस होतो व अर्गोनॉट लोकाचा लढाई-तील निरोप कळविणारा अधिकारी (herofd) म्हणून मी काम करीत असे, यूफार्बसच्या जन्मात मृत्यु आल्यानतर मला जो जन्म आला त्यात माझे नाव ह्र्मोटिमस होते, त्या जन्मानतर डेलॉस येथील कोळी जातीत माझा जन्म झाला, त्या जन्मात माझे नाव पिऱ्हस होते, व त्यानतर मी पायथॅगोरस झालो, असे तो सागे [1]

ही पायथॅगोरसची आठवण सगतवार आहे व तीत बराच तपशीलही आहे हे वरील हकीकतीवरून वाचकाच्या लक्षात येईल

## महाराष्ट्रांतील संत

महाराष्ट्र सतामध्येही अशा प्रकारची उदाहरणे आहेत जनाबाईचा पुढील अभग पहा [2]

**ऐका हो नामयाचा मूळ जन्म संचित ।। ध्रु ।।**
**हिरण्यकश्यपकुळी नामा प्रल्हाद ।**
**पद्मिनी नाम माझें श्रेष्ठ दासीचें पद ।। १ ।।**
**दुसरा जन्म याचा अंगद रामभक्त ।**
**मंथरा नाम माझे भरतें मारिली लाथ ।। २ ।।**
**द्वापारीं कृष्णसेवा उद्धव जन्मला ।**
**कुबज्या नाम माझे देवें उद्धार केला ।। ३ ।।**
**कलींत नामदेव विठ्ठल चिंतनीं ।**
**त्याचीच सेवे लागीं दासी जन्मली जनी ।। ४ ।।**

या अभंगात जनाबाईने आपले पद्मिनी, मथरा, व कुबज्या असे तीन पूर्वजन्म सागितले असून, त्या तिहीत मी नामदेवाची सेवक होते असे वर्णिले आहे. पण ही माहिती काल्पनिक आहे

---

१ पहा हेस्टिंग्स कृत Encyclopaedia of Religion and Ethics खड १२ पृष्ठ ४३३, विषय Transmigration.

२ पहा आवटेकृत गाथा पचकातील नामदेव गाथा, प्रकरण जनाबाईचे अभग क्रमाक २९४.

की पूर्वजन्मीच्या आठवणीवरून मिळविलेली आहे याचा अभगांत उल्लेख नाही.

नामदेव हेच पुन जन्म घेऊन तुकाराम होऊन आले असा वारकरी मडळात समज प्रचलित आहे[१] निळोबारायांच्या एका अभगात "जगद्गुरु तुका अवतार नामयाचा" असा उल्लेख आहे.[२] तसेच रामेश्वरभट्ट यानी "तुका सर्व श्रेष्ठ प्रिय आम्हा थोर। जो का अवतार नामयाचा॥" असे म्हटले आहे.[३] हे जर खरे मानले तर तुकारामाचे मागचे चार जन्म प्रल्हाद, अंगद, उद्धव व नामदेव असे होते हे निश्चित होते.[४] तुकारामानी स्वतः

**मागे बहुतां जन्मीं । हेंच करीत आलों आम्ही ॥**
**भवतापा श्रमीं । दुःखें पीडिले निववूं त्यां ॥**

असा स्वतःच्या पूर्वजन्मासबधीचा उल्लेख केला आहे. पण स्वत ची आपणाला आठवण आहे की काय याचा खुलासा तुकारामानी केलेला नाही.[५]

१ पहा पागारकर याचे तुकाराम चरित्र पृ. १०

२ आवटेकृत गाथापचकातील निळोबारायाचा गाथा पृष्ठ ७५ अभग ८८४

३ उपरोक्त गाथापचकातील 'तुकारामाचा गाथा' या भागात रामेश्वर भट्टाचे अभग दिले आहेत त्यातला पहिला अभग पहा पृ. २९७.

४ महाराष्ट्र सताच्या वाङमयाची योग्य ती छाननी अद्याप झालेली नाही. त्यामधील अपपाठ कोणते, प्रक्षिप्त भाग कोणते हे ठरविणे सोपे नाही. वरील माहितीत काही तरी चूक असावी असे वाटते. कारण "नामदेवे केले स्वप्नामाजी जागे। सवे पाडुरगे येऊनीया॥ सागितले काम करावे कवित्व। वाऊगें निमित्त बोलू नको॥" असा तुकारामाचा अभग प्रसिद्ध आहे. (पहा उपरोक्त गाथा पचक, तुकारामाचा गाथा, अभग ३७१३ पृ. २३४.) तुकाराम जर स्वत च पूर्वजन्मीचे नामदेव असतील तर तुकारामाना नामदेवाने स्वप्नात येऊन कवित्व करण्याची आज्ञा दिली याचा अर्थ काय?

५ उपरोक्त गाथापचकातील तुकारामाचा गाथा अभग ३५२० पृ २१८.

पूर्वजन्मीची व्यवस्थित आठवण सत बहिणाबाई याना दिसते. त्यानी आपले पूर्वीचे बारा जन्म ओळीने व सविस्तर सागितले आहेत. त्याच्या कवितासग्रहात सात मोठाले अभग त्या माहितीने भरलेले आहेत बहुतेक जन्माच्या माहितीत, त्यानी आई-बापाची नावे, जन्मस्थान, वयोमर्यादा, विवाह, अपत्ये, उद्योग वगैरेची माहिती दिली आहे महाराष्ट्र सतापैकी दुसऱ्या कोणीही आपल्या पूर्वीच्या जन्मासबधाने इतकी स्पष्ट व विस्तृत माहिती दिलेली आमच्या वाचनात नाही या सबधाची विशेष लक्षात ठेवण्याची गोष्ट म्हणजे ही माहिती मी माझ्या आठवणीवरून सांगत आहे असे बहिणाबाईनी स्वच्छ सागितले आहे. त्याचा इहलोक सोडण्याचा काळ दोन-चार दिवसावर आला होता व त्या वेळी अतरगात कांही खळबळ होऊन त्याची आठवण जागृत झाली होती असे दिसते. बहिणाबाईनी दोन वेळा,

**(१) अवघेचि ते जन्म आठवती मज ।**
**अंतरीचें गूज मृत्युवेळां ॥**
**(२) मागीलही जन्म आठवती कांहीं ।**
**त्वरा झाली देहीं मृत्युवेळे ॥**

असे म्हटले आहे या गोष्टीची लोकात परिस्फुटता होऊन लोकानी खोटेपणा आपल्या पदरात बाधू नये म्हणून त्यानी ‘ लटिकेचि शब्द व्यवहारी मानिनी । मूर्ख तयाप्रति बोलो नये ॥ ’ असे आपल्या मुलाला बजावले आहे [१] बहिणाबाईनी आपणाला कोणत्या प्रकारे जन्म आठवतात त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे दिले आहे –

**आरशांत जैसें दिसे प्रतिमुख ।**
**तैसे जन्म वेख दिसती डोळां ॥**

हे विधान अत्यत महत्त्वाचे आहे. असल्या गोष्टी माणसाच्या जाणिवेसमोर चित्रपटासारख्या दिसत असतात असे आधुनिक

१ हा सर्व भाग सत बहिणाबाईकृत कवितासग्रह या रा. उमरखाने यानी छापलेल्या पुस्तकात पृ. १७१–१७९ या पानावर आहे.

मशोधकाचे म्हणणे आहे [1] बहिणाबाईनी आरशातील प्रतिबिबाची उपमा दिली आहे. आधुनिक सशोधक व सत बहिणाबाई याच्या वर्णनात इतके साम्य यावे ही गोष्ट सस्मरणीय असून परस्पराच्या अनुभवास दुजोरा देणारी आहे. बहिणाबाईच्या पूर्वीच्या बारा जन्मात त्याचा त्या वेळचा जन्म मिळविला म्हणजे त्या तेरा जन्माची सकलित आयुर्मर्यादा ३५१ वर्षे होते त्या तेरापैकी शेवटल्या जन्मात त्याचे आयुष्य ७२ वर्षांचे होते. मधल्या एका जन्मात त्याचे आयुष्य सर्वात कमी म्हणजे नऊ वर्षांचे होते काही जन्मांत त्या विवाहित होत्या, काहीत नव्हत्या, काही जन्मात त्या ब्राह्मण होत्या, काहीत त्या इतर जातीत होत्या, काही जन्मात त्यानी ईश्वरभक्ति योगसाधन याकडे विशेष लक्ष दिले होते वगैरे माहिती त्यानी दिली आहे [2]

---

१ थिऑसफीय परिभाषेत या चित्रपटास Akashic Records असे म्हणतात त्याची जास्त माहिती लेडबीटरकृत Clairvoyance या पुस्तकात आहे

२ हे बहिणाबाईनी दिलेले वर्णन विस्तृत आहे तेव्हा ते सारे प्रक्षिप्त मानता येणार नाही पण त्यात काही अपपाठ व चुका असाव्या असे वाटते. त्यानी मधल्या तीन जन्माची म्हणजे चौथा, पाचवा व सहावा ह्या जन्माची आयुर्मर्यादा मुळीच दिलेली नाही. पण सर्वाची सकलित आयुर्मर्यादा ३५१ अशी दिली आहे व हे तीन जन्म अजिबात सोडून बाकीच्या जन्माच्या आयुर्मर्यादाची बेरीज घेतली तर ती ३५१ भरते याचा अर्थ असा होतो की त्या तिन्ही जन्माचे त्याचे एकदर आयुष्य १ वर्षापेक्षा कमी होते. हे तिन्ही जन्म लागोपाठ झालेले आहेत, व त्यात त्यानी काही उद्योग केले आहेत असे वाटते तेव्हा ह्या जन्मापैकी प्रत्येकात त्याना थोडे तरी आयुष्य असले पाहिजे असे अनुमान निघते या वर्णनात बहिणाबाईनी आपल्या प्रस्तुतच्या जन्माचेही वर्णन दिले आहे त्यानी आपल्या गाथ्यात प्रारभी प्रस्तुत जन्माचे जास्त सविस्तर वर्णन सागितले आहे ही दोन्ही वर्णने बऱ्याच बाबतीत जुळतात पण काही थोड्या बाबतीत त्यात विरोध आहे त्या देहूला आल्या तेव्हा

(टीप पुढील पानावर चालू)

कित्येक अलीकडच्या व्यक्तीनीही पूर्वजन्माची आठवण असल्याबद्दल विधाने केलेली आहेत. थिऑसफिकल सोसायटीमधील डॉ. बेझट व मि लेडबीटर याना योगशास्त्र शिकून पूर्वजन्माची आठवण जागृत करता आलेली आहे त्या विषयीचे उल्लेख त्या ग्रथकाराच्या अनेक पुस्तकात सापडतील मि जे कृष्णमूर्ति यानाही पूर्वजन्माची आठवण आहे असे त्यानी म्हटलेले आहे[१]

---

(टीप मागील पानावरून)

गर्भार होत्या व त्या वेळी पुत्र झाला असे पृ १७६–१७७ वर आहे, पण पृष्ठ २४ वर मुलगी झाली असे लिहिले आहे देहूस तुकाराममहाराजाचा अनुग्रह होण्याच्या जरा पूर्वी त्याचा नवरा देहू सोडून पुण्यास गेला होता तो रागीट होता व तेथे त्या वेळी असता तर त्याची बहिणबाईस अडचण झाली असती तो घरी नसतांना आईची परवानगी घेऊन बहिणाबाईनी एक व्रत केलें व मग त्याच्यावर तुकारामानी अनुग्रह केला असे पृ. १७६ वर वर्णन आहे पृ १९-२० वरील वर्णन याशी विसगत दिसते पृ ४ वर लिहिलें आहे की बहिणाबाई व त्याचे आईबाप ही सारी त्याच्या नवऱ्यासमवेत आपले मूळगाव सोडून परगावी गेली होती, तर पृ. १७६ वर त्याचा नवरा त्या वेळी कोल्हापुरास होता असे सागितले आहे या विरोधावरून असे वाटते की, पोथी छापताना अपपाठ व बारीक सारीक चुका झाल्या असाव्या. निरनिराळ्या पोथ्या गोळा करून व परस्पराशी ताडून जर बहिणाबाईचे अभग छापले असते तर असले बारीक सारीक विरोध राहिले नसते असे वाटते रा कोल्हारकर यानी व्रत बहिणाबाईची गाथा चित्रशाळा प्रेसमध्ये छापविली आहे त्यातही हे विरोध आहेतच.

१ ते म्हणतात For me reincarnation happens to be a fact because I remember certain things. . . . For me reincarnation is a fact and not a belief (स्टार बुलेटीन मार्च १९३१, पृ ८, पहा जानेवारी १९३२ पृ. १५ तसेच The Hidden side of Things या नांवाच्या लेडबीटरकृत पुस्तकातील पृ. १८२ पहा )

---

प्रकरण ९ वें

# ह्या सिद्धान्ताचा व्यवहारांत उपयोग

माणसाला अनेक जन्म असतात, अर्थात् आपण व आपले इष्टमित्र याचा जो सध्या जन्म चालू आहे त्याच्या अगोदर त्याचे व आपले किती तरी जन्म पूर्वी होऊन गेले आहेत व सध्यांच्या जन्मानतर किती तरी जन्म पुढे व्हावयाचे आहेत हे दर्शविणारी अनेक प्रमाणे या पुस्तकात आम्ही येथवर दाखल केली आहेत ती वाचून पुनर्जन्माचा सिद्धान्त जिज्ञासू माणसाला पटण्यासारखा आहे असे आम्हास वाटते हा सिद्धात तर्कशास्त्राचा काथ्याकूट करण्यासाठी नाही मानवी जीवनात या सिद्धान्ताचा पुष्कळ उपयोग आहे तो उपयोग कोणता या प्रश्नाचे उत्तर प्रस्तुत प्रकरणात आम्ही देणार आहो

## पुनर्जन्माची प्रक्रिया

राजयोगाचा अभ्यास करून माणसाला सूक्ष्मदृष्टि प्राप्त करून घेता येते. ज्याने ती तशी प्राप्त करून घेतली असेल त्याला पुनर्जन्माविषयीच्या सर्व अदृश्य गोष्टी प्रत्यक्ष पहाता येतात थिऑसफिकल सोसायटीतल्या कित्येक पुढाऱ्यानी सूक्ष्मदृष्टि सपादन करून घेऊन माणसाचे पुन पुन्हा जन्म कसे होतात याचे बारकाईने तपशीलवार व मोठ्या प्रमाणावर सशोधन केलेले आहे [1] त्या सशोधनावरून

१ या सशोधनाची माहिती The Lives of Alcyone खड १ व २ व The Soul's Growth through Reincarnation या सामान्य मथळ्या-

(टीप पुढील पानावर चालू)

असे दिसून येते की माणसाला अनेक देह असतात, त्यापैकी स्थूलदेह मात्र दृश्य असतो इतर देह विरळ द्रव्याचे बनलेले असल्यामुळे आपणाला दिसत नाहीत जीवतपणी हे सर्व देह एकमेकास सलग्न असतात, व मनुष्य जागृत असताना त्याची जाणीव त्याच्या स्थूलदेहात वावरत असते मृत्यूच्या वेळी हा सर्व देहांचा सच फुटतो. स्थूल देह इतर सर्व देहापासून विलग, अत एव मृत होऊन वेगळा पडतो आणि आपण त्यास जाळतो किंवा पुरतो. बाकीचे देह एकमेकास पूर्ववत् सल्लग्न राहिलेले असतात व त्यात समाविष्ट असलेल्या प्राणमय कोषात मरणोत्तर काही तास (किंवा फारतर एक दोन दिवस) माणसाची जाणीव वसत असते. त्या अवधीत माणूस ( जीव ) मनाने झोपल्यासारखा

---

( टीप मागील पानावरून )

खाली सी जिनराजदास यानी प्रसिद्ध केलेल्या Lives of Erato and Spica; Lives of Orion; Lives of Ursa, Vega and Eudox, Lives of Ulyssis, Abel, Arcor and Vale या चार पुस्तकात आहे हे पूर्वजन्माचे बहुतेक सशोधन श्री. लेडबीटर यानी मुख्यत व डॉ बेझंट यानी अशत: केलेले आहे कारण–देहातील सूक्ष्म-दृष्टि उपयोगात आणून आकाशलेखाचे (Akashic Records) अवलोकन करावयाचे ही त्याची सशोधनपद्धति होती वरील पुस्तकातील व्यक्तींची नावे टोपण नावे आहेत, त्यापैकी आल्किओनी (Alcyone) या व्यक्तीचे सध्याच्या जन्माच्या पूर्वीचे ४८ जन्म तपासून पाहण्यात आले आहेत दर जन्माच्या वर्णनानतर त्याच्याबरोबर पुन जन्म घेऊन आलेल्या इतर सबधी व्यक्तीचीही नावे त्या पुस्तकात नमूद केलेली आढळतील आल्किओनीसमवेत दर जन्मी सरासरीने ३० व्यक्ति नवा जन्म घेऊन येतात असे मानल्यास ४८ गुणिले ३० म्हणजे १४४० पुनर्जन्माची उदाहरणे सशोधकानी पाहिली आहेत असा हिशेब येतो वरील सर्व पुस्तके जमेस धरल्यास ह्या उदाहरणांची सख्या अनेक हजाराच्या घरात जाईल यावरून वरील सशोधन किती विस्तृत आहे याची कल्पना वाचकानी करावी अर्थात् या सशोधनावरून बसविलेले नियम फारसे चुकले असण्याचा सभव नाही हे आमच्या वाचकानी ध्यानात ठेवावे

असतो काही तासानतर हा सच पुन फुटतो, आणि त्यातील प्राणमय कोषाचे द्रव्य विस्कटून तो नाहीसा होतो. फक्त त्यातला एक परमाणु शिल्लक राहून तो इतर देहाच्या सचाशी बाधलेला रहातो. प्राणमय कोष नाश पावल्यावर माणसाची जाणीव त्या सचातील वासनादेहात वावरू लागते. त्या काळी तो मनानें जागा असतो या स्थितीत तो अनेक वर्षे काढतो नतर वासना-देहही विस्कटून नाहीसा होतो मात्र या देहातील एक परमाणु मागे राहून त्या सचात अनुस्यूत रहातो वासना–देह गळून गेल्यावर त्या सचात फक्त मनोदेह व कारणदेह हे उरतात आणि त्याची जाणीव प्रथम मनोदेहात वावरू लागते. या स्थितीत तो बहुधा पुष्कळ वर्षे काढतो ती वर्षे सपल्यावर मनोदेहाचे द्रव्यही विरून नाहीसे होते आणि त्याचा एक परमाणु मागे राहून तो त्या सचापैकी शिल्लक असलेल्या कारणदेहाला बाधला जातो या स्थितीत माणसाची जाणीव त्याच्या कारण-देहात असते ही अवस्था अल्पकाळ टिकते अशा रीतीने मरणोत्तर स्थितीच्या कालखडात त्याच्या अनेक देहाच्या सचापैकी क्रमाने एकेक नाहीसा होतो व सरतेशेवटी माणसाचा कारणदेह व त्यास बाधलेले तीन परमाणु इतकीच सामग्री शिल्लक उरते मरणोत्तर स्थितीच्या नाटकाचा हा शेवटचा अक होय या नाटकात माणसाचे गत जन्मातले स्थूलदेह, प्राणमय कोप, वासनादेह व मनोदेह हे वर वर्णिल्याप्रमाणे क्रमश वितळून मरून जातात आणि फक्त कारण-देह उरतो तो मात्र वितळून नष्ट होत नाही. मागील जन्मात जो माणसाने गुणविकास व ज्ञानविकास केला असेल, जो अनुभव गाठी बाधला असेल तो सर्व कारण देहाच्यातिजोरीत साठविला जातो आणि मनुष्य नवीन जन्म घेण्याच्या वळणापाशी येऊन ठेपतो.''[१]

१ वरील प्रक्रियास बराच काळ लागत असल्यामुळे माणसाच्या दोन जन्मात पुष्कळ वर्षाचे अतर जात असतें अतर किती जाते याची

( टीप पुढील पानावर चालू )

या नवीन जन्मात कारणदेह पूर्वीचाच कायम असतो. अर्थात् नवीन जन्म झाल्यावर जर त्या माणसाला आपल्या मेदूचा सबध कारणदेहाशी जोडण्याची क्रिया करता आली तर त्याला पूर्वीच्या जन्माची आठवण होऊ शकेल नवीन जन्मात कारण-देह पूर्वीचाच असला तरी बाकीचे सर्व देह नवे तयार करावे लागतात कारणदेहाशी बाधलेला एक परमाणु जागृत होऊन

( टीप मागील पानावरून )

माहिती जिनराजदासकृत First Principles of Theosophy या पुस्तकातील पुनर्जन्मावरील प्रकरणात दिलेली आढळेल माणसाने पूर्व आयुष्यात जो अनुभव मिळविलेला असेल तो पचविण्याकरता मरणोत्तर स्थितीचा काळ असतो, व अनुभव पचवून सपल्यावर पुढचा जन्म येतो. अर्थात् माणूस अल्पायुषी होऊन मेला असल्यास सचित अनुभव कमी असतो, तो पचविण्यास थोडा काळ पुरतो व जन्म लवकर होतो दोन माणसाचे पूर्व आयुष्य साठ वर्षांचे असले आणि एक हेलपाटी करणारा हमाल असला आणि दुसरा महत्त्वाचे नाना उद्योग करणारा लोकमान्य टिळकासारखा असला, तर पहिल्याच्या गाठी अनुभव कमी असतो, दुसऱ्याच्या गांठी फार जास्त असतो, आणि म्हणून पहिल्यापेक्षा दुसरा जास्त काळानतर जन्मास येतो स्थूल मानाने सागावयाचे असल्यास पूर्वजन्मीचा आयुर्दाय व माणसाचा उत्क्रान्तीतील दर्जा यावर त्याच्या दोन जन्मातील काळ अवलबून असतो. पण ह्यास अनेक अपवाद आहेत कधी कधी मरणोत्तर स्थितीत वासनादेह–मनोदेह विस्कटून न जाता पूर्वीचेच ते दोन देह घेऊन माणूस जन्मास येतो अशा वेळी पुढचा जन्म फार लवकर होत असतो या पुस्तकात जी पुनर्जन्माची उदाहरणे पुराव्यादाखल आम्ही दिली आहेत ती अशा प्रकारची अपवादात्मक आहेत. दोन तीन हजार वर्षांपूर्वीच्या जन्माची स्मृति ज्याना आहे अशाची उदाहरणेही या पुस्तकात आम्ही पूर्वी दिली आहेत त्याचा अर्थ असा नव्हे की त्या जन्मानतर दोन तीन हजार वर्षे लोटली व मग त्याना सध्याचा जन्म मिळाला. मध्यतरी काही जन्म झाले होते, त्यातील हकीकती अगदी प्राकृत दर्जाच्या असल्यामुळे त्याच्या आठवणीचा ठसा बुजून गेला, आणि तत्पूर्वीच्या अत्यत महत्त्वाच्या जन्माची आठवण मात्र शाबूद राहिली असे झाले असण्याचा संभव आहे.

नवीन मनोदेहाचे द्रव्य आकर्षित करतो दुसरा परमाणु त्याचप्रमाणे नवीन वासनादेहाचे द्रव्य ओढून घेतो तिसरा परमाणु भावी जन्मातील मातेच्या देहाशी जोडला जाऊन तिच्या उदरात त्या माणसाचा प्राणमय कोश व स्थूल देह याची हळू हळू रचना सुरू होते आणि अर्धवट तयार झालेले हे नवीन देह घेऊन नऊ महिन्यानी तो नव्या जन्माच्या रंगभूमीवर प्रवेश करतो काही वर्षांनी त्या सर्व देहाची बाधणी पुरी होऊन सर्व देह आपापले उद्योग उत्कृष्ट रीतीने करण्यास समर्थ होतात. स्थूल देह वाढून तो सर्व प्रकारच्या क्रिया करण्यात निपुण होतो स्थूल देहाला प्राणशक्ति नीटपणें पुरवावयास प्राणमय कोष लायक होतो वासनादेह व मनोदेह हे विविध प्रकारच्या वासना व विचार व्यक्त करण्याला समर्थ होतात आणि अशा रीतीने नव्या जन्मातील सर्व कार्ये सुरळीतपणे चालू व्हावयास लागतात

पुनर्जन्माची प्रक्रिया ही अशी आहे. दर जन्मात कारण-देह पूर्वीचाच असतो आणि वर लिहिलेले तीनही परमाणु पूर्वीचेच असतात. पण बाकी सर्व जामानिमा, बाकी सर्व देह नवीन असतात. ह्या कारणदेहात जाणिवेची जी ठिणगी असते तिला जीव किवा जीवात्मा असे नाव दिल्यास ते सार्थ होईल ह्या जीवात्मा कारण-देहात कायमचा रहातो आणि स्वत चा विकास करण्यासाठी पृथ्वीवर पुन. पुन्हा जन्म घेतो दर जन्मी तो नाना उद्योग करतो, सुखे भोगतो व दु खेही भोगतो आणि त्या नाना उद्योगापासून आणि सुखदु खापासून शहाणपणा शिकतो बुद्धिमत्ता, नीतिमत्ता, कर्तृत्वशक्ति वगैरे गुणात प्रगति करतो दर जन्मी जो अनुभव त्याने गोळा केलेला असेल त्यातील फोलकट टाकून देणे व पौष्टिक भाग पचवून स्वत ची वाढ करणे हे काम तो मृत्यूनतरच्या स्थितीत करीत असतो. त्याची सर्व कमाई कारण-देहात साठविलेली असते. असे अनेक जन्म त्याने घ्यावे, दर जन्मात नवीन धडे शिकून प्रगति करावी व सर्व बाजूनी परमोच्च कोटीचा विकास करून श्रीकृष्ण–बुद्ध–शकराचार्य यासारखे आदर्श

पुरुष बनावे ही माणसाची भवितव्यता आहे. आपण सर्व त्या मार्गाने पुढे चाललो आहो.

## पुनर्जन्मविषयक तीन नियम

थिऑसफीच्या चळवळीमध्ये जे पुनर्जन्मविषयक संशोधन झालेले आहे त्याचा विचार करता माणसाच्या पुन पुन्हा होणाऱ्या जन्मास काही नियम लागू आहेत असे दिसून येते. त्या नियमाकडे आपण दृष्टिक्षेप करणे अवश्य आहे ते नियम तीन आहेत पहिला नियम असा की माणूस उत्क्रांतिमार्गावर जेथपर्यंत येऊन पोहोचला असेल त्याच्या पुढची उत्क्रांति ज्या ठिकाणी व ज्या परिस्थितीत त्याला करता येईल त्या ठिकाणी व त्या परिस्थितीत त्याला जन्म दिला जातो जन्म आधळेपणाने कोठे तरी होत नाही नुसत्या त्याच्या बऱ्यावाईट कर्मानुसारही होत नाही माणसाच्या कर्माचा त्याच्या पुनर्जन्माशी सबध असतो हे खरे आहे पण कर्मापेक्षाही उत्क्रांतीचा प्रश्न अधिक जिव्हाळ्याचा असतो माणूस दर जन्मी आपल्या कृतकर्माची फळे भोगीत असला तरी त्याची उत्क्रांति करणे हे सृष्टीचे ध्येय असल्यामुळे त्याच्या उत्क्रांतीच्या गरजेला जास्त महत्त्व देण्यात येऊन तदनुसार त्याला जन्मास घालण्यात येते माणसाला विशिष्ट स्थळी जन्म देण्यास ज्या अनेक गोष्टी कारणीभूत होतात त्यापैकी त्याच्या उत्क्रांतीची गरज ही गोष्ट सर्वात जास्त प्रभावी अशी गणली जाते समजा एक माणूस आहे, आणि त्याला जन्मास घालावयाचे आहे पृथ्वीवर अशी शभर स्थळे असू शकतील की त्यापैकी कोणत्याही स्थळी त्याचा जन्म झाला तरी त्याची पुढील उत्क्रांति होईल या शभर स्थळापैकी काही उच्च प्रतीची असतील, काही मध्यम असतील, तर काही कनिष्ठ असतील त्या माणसाचे पूर्व-कर्म जसे असेल तदनुसार त्याला उत्तम, मध्यम वा कनिष्ठ अशा ठिकाणी जन्म देण्यात यावा हा पुनर्जन्मविषयक दुसरा नियम होय कल्पना करा की एक मनुष्य आहे तो स्वभावाने निरुद्योगी व आळशी आहे, व उत्क्रांतिक्रमानुसार त्याच्या येत्या

जन्मात त्याचा आळस झाडून टाकून त्याला उद्योगी व मेहनती बनविण्याची सुरवात व्हावयाची आहे ते अनेक प्रकारच्या जन्मात साध्य होऊ शकेल त्याला अशा ठिकाणी जन्म द्यावयाचा की तो उद्योग न करील तर उपाशी मरेल, जेव्हा तो बारा तास कष्ट करील तेव्हाच त्याचे पोट भरेल. हा कनिष्ठ स्थळातला जन्म होय धामधुमीच्या काळात त्याला लष्करातला शिपाई बनविला, तर लष्करी कवाईत, सैनिकी शिस्त, युद्धाच्या हालचाली आणि जिवावर उदार होऊन लढण्याची आवश्यकता या परिस्थितीतही तो उद्योगी बनण्याचा प्रारभ होऊ शकेल हे स्थळ मध्यम मानावे लागेल कारण हा उद्योग नुसता पोटापाण्याचा आहे असे त्याला वाटणार नाही त्यात देशभक्तीच्या व कर्तव्यनिष्ठेच्या आनदाची भर पडेल व त्याच्या जीवनाची पातळी थोडी तरी उचावेल त्याला अत्यत बुद्धिमान्, अत्यत हौशी व अत्यत उद्योगी माणसाच्या कुटुबात जन्म दिला आणि स्वत.च्या आळशीपणाची त्याला लाज वाटेल व इतराचे उद्योग बघून ईर्षेने त्यांच्यासारखे काम करण्याची स्फूर्ति त्याला येईल, अशा वातावरणात ठेविले तर त्या परिस्थितीतही तो उद्योगी बनण्यास सुरवात होईल हे स्थळ उत्तम ठरेल कारण कमी दु:ख भोगून आणि जास्त आनदात राहून त्याला ती प्रगति करता येईल. माणसाला जन्म देताना त्याच्या समोर श्रेष्ठ कनिष्ठ अशी पुष्कळ स्थळें असू शकतात त्यापैकी त्याचे पूर्व कर्म जसे असेल तसे त्याला स्थळ मिळावे हा पुनर्जन्माचा दुसरा नियम होय ह्या नियमानुसार त्याचे पूर्वजन्मीचे कर्म वाईट असले तर उत्कृष्ट स्थळे त्याच्या हातची सुटून जातात व अशा रीतीने वर कल्पना केलेल्या शभर जागापैकी पन्नास जागा त्याला मिळू शकत नाहीत राहिलेल्या पन्नास स्थळापैकी एक दोन स्थळातच त्याला पूर्व जन्मीचे शत्रू मित्र, पूर्वजन्मीचे गुरुजन, पूर्वजन्मीचे इष्टमित्र भेटून जरूर त्या पूर्वकर्माच्या देवघेवी करण्याची सधि असते, म्हणून तेथेच त्याला जन्म मिळतो पूर्वजन्मी ज्या व्यक्तीशी

माणसानें ऋणानुबध जोडलेले असतील, त्याच्या परिसरात त्याचा जन्म व्हावा हा पुनर्जन्मासबधीचा तिसरा नियम होय या नियमानुसार पूर्व ऋणानुबधानी बाधलेल्या नाना व्यक्ती एके स्थळी आकर्षिल्या जाऊन तेथे जन्मास येतात

## पुढचा जन्म व उत्क्रान्ति

या नियमाचा नीट अन्वयार्थ लावल्यास माणसाच्या जीवनाला उत्कृष्ट वळण लागू शकेल माणसाचा जन्म आधळेपणानें कोठे तरी होत नाही, तो अशा ठिकाणी, अशा देशात, अशा सस्कृतीत, अशा धर्मात, अशा परिस्थितीत, अशा कुटुबात, व अशा शत्रुमित्राच्या परिसरात आपोआप होतो की तेथे स्वत ची पुढची उत्क्रान्ति त्याला करता यावी हा नियम माणसाला उमजल्यास तो आपल्या स्वत कडे व आपल्या सभोवतालच्या जगाकडे नवीन दृष्टीने पहावयास लागेल मी उत्क्रान्तिपथावरून दरजन्मी पुढे पुढे जात आहे, अनेक जन्मानी मला मानव्याचा उच्चाक गाठावयाचा आहे, तेव्हा त्या दिशेने मला या जन्मी शक्य तितकी अधिक वाटचाल केली पाहिजे असा तो निश्चय करील, आणि शक्य तितका तो निश्चय कृतीत उतरवील तो खेळ खेळणार नाही, विश्रांति घेणार नाही, करमणुकीत वेळ घालवणार नाही, विनोद करणार नाही, चागले कपडे पेहरणार नाही आणि सुग्रास अन्न खाणार नाही असे बिलकुल नाही जरूरीप्रमाणे या सर्व गोष्टी तो करील, पण तो अशा रीतीने त्या करील की त्याचा आपल्या उत्क्रान्तिमार्गावर अडथळा होऊ नये, मन ताजेतवाने करावे व उत्क्रान्तिमार्गानें पुढे जाण्याचा आपला वेग वाढवावा यासाठी तो असल्या गोष्टीचा सुबुद्धपणे उपयोग करील. जर त्या गोष्टी त्याच्या प्रगतीच्या आड येऊ लागल्या तर तो त्याचे प्रमाण बदलील व तितकीच जरुरी पडल्यास तो त्या अजिबात टाकून देण्यासही तयार राहील. मानवी उत्क्रातीशी ज्या गोष्टीचा सबध नाही अशा फोल व निरर्थक गोष्टीत बहुतेक

माणसे आपले आयुष्य खर्च करतात ह्या नियमाचे मर्म समजणारा माणूस आपल्या कालाचा असा अपव्यय करणार नाही

स्वत ची उत्क्रांति करणे याचा अर्थ काय ? अधिक अधिक प्रमाणात आदर्श माणसासारखे होणे आदर्श माणूस कसा असतो ? तो निर्दोष असतो, नीतिमत्ता, बुद्धिमत्ता, कर्तृत्वशक्ति वगैरे सर्व गोष्टी त्याच्या ठिकाणी सपूर्णपणे फुललेल्या असतात चालू जन्मात आपली परिस्थिति कशी आहे, आपल्या स्वभावात गुणदोष कोणते आहेत, कोणती कर्तव्ये आपणासमोर आहेत, याचा आढावा घेऊन आपणाला कोणकोणत्या बाबतीत उत्क्रांति करता येईल हे प्रत्येक माणसाने ठरविले पाहिजे जन्म जर उत्क्रांतीसाठी आहे तर त्या उत्क्रांतीला आपल्या आयुष्यात पुष्कळच वाव असला पाहिजे हे उघड आहे माणसाला तीन बाजू असतात एक वासना-भावनाची बाजू, दुसरी बुद्धिमत्तेची बाजू, तिसरी क्रियेची, कर्तृत्वाची, उद्योगाची बाजू असते या तिन्ही बाजूनी सुधारणा करणे, स्वत च्या मातापितरासाठी, पत्नीसाठी, पतीसाठीं, मुलासाठी, नागरिकासाठी, देशासाठी, धर्मासाठी, सस्कृतीसाठीं मानवजातीसाठी, अधिक अधिक प्रमाणात हृदयात सद्भावना वागविणे, मनात बुद्धिमत्ता फुलविणे आणि जगात सदुद्योग करणे म्हणजे आदर्श माणसासारखे हळू हळू बनत जाणे होय माणसाने प्रयत्न केल्यास यातला किती व कोणता भाग आपणाला ह्या जन्मी करण्यास वाव आहे तें त्याला निश्चित करता येईल व तदनुसार आपल्या आयुष्याला वळण लावता येईल

## बरीवाईट परिस्थिति

दुसऱ्या नियमावरून दिसून येईल की, जरी उत्क्रांति होईल अशा परिस्थितीत माणसाला नियमाने जन्म मिळत असला, तरी त्याच्या स्वत च्याच पूर्वकर्मामुळे ती परिस्थिति कधी उच्च असते, कधी मध्यम असते तर कधी कनिष्ठ असते अर्थात् पुष्कळदा परिस्थितीत अडचणी व वैगुण्ये असतात बहुजन-समाज या अडचणीकडे सदा बोट दाखवून ज्या गोष्टी प्रयत्नत शक्य आहेत

त्या बिलकुल न करता उत्क्रांतिमार्गावर थबकून राहिलेला असतो या अडचणी दूर झाल्या म्हणजे मी ध्येयनिष्ठ जीवनास सुरवात करीन असे म्हणून लोक स्वत ची व जगाची वचना करीत असतात अडचणी सपल्यावर मी सत्कार्यास प्रारभ करीन असे म्हणणे म्हणजे वहात्या नदीच्या काठावर उभे राहून, वाहून वाहून हे पाणी जेव्हा सपेल तेव्हा पाण्यात पाऊल न भिजविता मी नदीपार होईन, असे म्हणण्यासारखे आहे गरीब माणूस म्हणतो मी श्रीमत झाल्यावर चागल्या गोष्टीस प्रारभ करीन नोकरी करणारा माणूस म्हणतो पेनशन घेतल्यावर त्याची सुरवात करीन. अशक्त माणूस म्हणतो, सशक्त झाल्यावर सुरवात करीन महत्त्वाकाक्षी माणूस सागतो, मोठ्या कार्याची सधि मिळाल्यावर प्रारभ करीन हे लोक आज काय करतात त्याची चवकशी केली तर जमेकडे पूज्य माडलेले दिसते. या अडचणी खऱ्या नाहीत असे आम्ही म्हणत नाही अडचणी दूर झाल्या तर जास्त प्रगति करण्यास वाव सापडतो हे आम्हास मान्य आहे. आमचे म्हणणे इतकेच की अडचणीतही थोडे सत्कार्य करण्यास वाव असतो आणि अडचणीतही जो थोडे तरी सत्कार्य करतो तोच अडचणी सपल्यावर अधिक सत्कार्य करू शकतो कधी कधी असे आढळून येते की, असल्या माणसाची अडचण सपते. गरीब माणूस श्रीमत बनतो, नोकरीतला माणूस पेनशन घेतो, पण सत्कार्यास सुरवात होत नाही ! माणसाची ध्येयनिष्ठा शून्य असल्यास अनुकूलतेचा गुणक कितीही मोठा मिळाला तरी गुणाकार शून्यच येतो जगात चागली कामे ज्यानी केली आहेत त्याचे चरित्र पाहिल्यास बहुधा असे आढळेल की नाना अडचणीतून कशी बशी वाट काढूनच त्यानी आपल्या कार्यास प्रारभ केला आहे.

याचा अर्थ असा नव्हे, की माणसाने आपल्या अडचणी कमी करण्याचा किवा परिस्थिति सुधारण्याचा उद्योग करू नये चौहो बाजूनी आपली परिस्थिति सुधारणे व त्यासाठी जोराची

खटपट करणे हे त्याचे काम आहे गरीबाने पैसे मिळवून श्रीमत व्हावे, अशक्ताने व्यायाम करून सशक्त व्हावे, वाईट व व्यसनी लोकात रहाणाराने ते संबंध तोडून चांगल्या लोकांशी संबंध जोडावे, आणि ह्या प्रयत्नाने आपली परिस्थिति त्याने सुधारावी माणसाला दर जन्मी विशिष्ट प्रकारची बरी वाईट परिस्थिति त्याच्या पूर्वकर्मानुसार मिळते असे जेव्हा आम्ही म्हणतो, तेव्हा त्या परिस्थितात माणूस जे बदल प्रयत्नत करू शकेल त्याचाही हिशेब धरलेला असतो हे आपण लक्षात ठेवले पाहिजे मात्र स्वतःची परिस्थिति बदलण्याची खटपट माणूस जेव्हा करील तेव्हा उत्क्रांति-मार्गावर जलद प्रगति करण्यासाठी ही माझी खटपट आहे ही गोष्ट त्याने दृष्टीआड करता कामा नये

सर्वसामान्य गोष्टी करूनच जगातील बहुतेक माणसांची उत्क्रांति होत असते हे लोकांच्या लक्षात येत नाही. पैसे मिळविणे व ते मिळविण्यासाठी नाना प्रकारची आटापीट करणे यात माणसाच्या उद्योगीपणाची, चलाखपणाची, बुद्धिमत्तेची वाढ होत असते लग्न करून संसार करणे, मुलाबाळांचे रक्षण, शिक्षण, संगोपन, संवर्धन करणे यातही कष्टाळूपणा स्वार्थत्याग, वात्सल्य वगैरे अनेक गुणांची वाढ होत असते अगदी लहान कामातही माणसाच्या गुणांची वाढ होते कपबशा विसळणे, घरातला केर काढणे असली हलकी कामही माणसाला स्वच्छपणा, टापटीप, काटेकोरपणा, ध्येयनिष्ठा, जबाबदारी वगैरे गुणांची शिकवण देतात माणसासमोर दोन कामे असली व त्यापैकी एकच करणे शक्य असले तर त्याने त्यापैकी जे जास्त मोठे व महत्त्वाचे असेल ते निवडावे हे ठीकच आहे पण फक्त हलकेसलकेच काम समोर असेल तर तेही केले पाहिजे त्यातही माणसाची उत्क्रांति असते माणसाला आवडो वा न आवडो, त्याच्या समोर दत्त म्हणून लहान मोठी अनेक कामे सदा उभी असतात व ती केल्यावाचून त्याला गत्यंतर नसते सर्व लोक ती करतात पण वेट

त्रावरल्याप्रमाणे करतात, नाइलाज म्हणून करतात त्यामुळे त्या कामाचा उत्क्रांति दृष्टच्या पुरेसा फायदा त्याना मिळत नाही या सर्व कामात माझी उत्क्रांति अनुस्यूत आहे असे समजून माणसाने ती केली पाहिजेत म्हणजे त्याची प्रगति जलद होते

प्रत्येक माणसाच्या आयुष्यात दु ख असते एकाद्याच्या आयुष्यात ते फार असेल एकाद्याच्या कमी असेल या दु खा-पैकी काही भाग असा असतो की तो शहाण्या माणसाला टाळता येईल खाणेपिणे, जाग्रणे करणे, वगैरे बाबतीत बेशिस्त वर्तन केल्यास माणूस आजारी पडतो दुसऱ्या लोकाशी भाड-खोरपणाने वागल्यास ते आपणास ताप देतात आपल्या आवाक्याबाहेर खर्च करीत राहिल्यास माणसाला दारिद्रय येते, आणि लबाडचा करून पैसे मिळविण्याच्या मोहात तो साप-डतो. वाईट इष्टमित्राच्या सगतीने आयुष्याला भलते वळण लागून दु ख वाटचास येते अशा प्रकारची दु खे शहाण्या माण-साला टाळता येतात स्वत.च्या अडचणी कमी करणे, स्वत वर दु खे येऊ न देणे हे माणसाचे अवश्य कर्तव्य आहे आणि शहाण्या माणसाला ते काही प्रमाणात तरी साधते पण पुष्कळ अडचणी व दु खे अशी असतात की त्याना बगल देणे शक्य नसते ती दु खे पूर्वजन्मातल्या बीजापासून उद्‌भवलेली असतात व भोगूनच सप-वावी लागतात दु खाचा हेतु माणसाला शहाणपणा शिकविणे हा आहे अर्थात् दु खानेही माणसाची उत्क्रांति होऊ शकते. मात्र दु ख भोगताना दुसऱ्या लोकावर न जळफळता त्या दु खापासून आपणाला काय शिकण्याजोगे आहे ते माणसाने पाहिले पाहिजे आजारीपणा माणसाला सहनशीलता शिकवितो व दुसऱ्याबद्दलची सहानुभूति वृद्धिगत करतो गरिबी माणसाला लीनपणा, हिशेबी-पणा, काटकसर वगैरे गुण शिकविते दुसऱ्याचा जुलूम किवा जाच सोसावा लागणारा माणूस जुलुमापासून किती दु ख होते ते प्रत्यक्ष अनुभवून दुसऱ्यावर जुलूम करू नये हा धडा शिकू शकतो दु खापासून असले धडे शिकल्यास माणसाची जलद

उत्क्रांति होते आणि दु खाचे कार्य मपल्यामुळे ती पुन येईनाशी होनात एवंच परिस्थिति कितीही प्रतिकूल असली नरी डोळस-पणाने तिचे निरीक्षण करणारास तीनही उत्क्रातीची वाट सापडू शकते

## इतरांचे ऋणानुबध

पुनर्जन्माचा तिसरा नियम व्यक्तीच्या ऋणानुबधाविपयीचा आहे. तो नियम माणसाला शिकवितो की ज्या व्यक्तीच्या परिसरात तो जन्मलेला आहे त्यापैकी पुष्कळाशी त्याचे येणारे मबध अजिबात नवे असत नाहीत ते पूर्वीच्या जन्मापासून चालत आलेले असतात ते प्रेमाचे असतात आणि द्वेपाचेही असू शकतात प्रत्येक माणसासभोवती जे निकटवर्ती स्त्रीपुरुष असतात, ज्याशी त्याचा सबध चिरकाल येतो ते पूर्वकालीन मित्र वा शत्रु असण्याचा सभव रहातो आपली पत्नी किवा आपला पति, आपले आईबाप, भाऊबहिणी, मुलेबाळे याचे आपले सबध बहुधा जवळचे व फार दिवस टिकणारे असतात आपले मित्र, आपल्या कार्यातले सहकारी, आपणास ज्ञान देणारे गुरुजन, पुष्कळ वर्षे सेवाचाकरी करणारे आपले नोकर, आणि ज्याच्या हाताखाली आपण कित्येक वर्षे काम केलेले असेल असे ऑफिसातले आपले वरिष्ठ यापैकी पुष्कळाचे ऋणानुबध अजी नवे असत नाहीत या मडळीत आपले पूर्वीचे मित्र असतात आणि शत्रूही असतात त्याची आपली पूर्वीच्या कर्माची देणी घेणी असतात आणि ती फेडून चागले सबध दृढ व्हावे व वाईट ऋणानुबध नि सत्त्व व्हावे यासाठी एका गटात ही माणसे जन्मास घातलेली असतात हे ओळखले की माणूस या ऋणा-नुबधाकडे शहाणपणाने पाहू शकतो द्वेपाचे ऋणानुबध अस-ल्यास ते शक्य तितके विझवावयाचे असतात प्रेमाचे असले तर ते वाढवावयाचे असतात श्रीकृष्ण–बुद्ध–ख्राइस्ट यासारखी आदर्श माणसे कोणाचाही द्वेष करीत नाहीत आणि अखिल मानव जातीवर त्याचे प्रेम असते भविष्यकाळी हा कठीण

वडा आपणाला पूर्णपणे शिकावयाचा आहे, त्याची पूर्वतयारी म्हणून माणसाला विशिष्ट गटात जन्मास घालून त्या गटातील माणसावर प्रेम करण्यास शिकविले जाते आपण हे प्रेमाचे ऋणानुबध ओळखले पाहिजेत आणि आपल्या वर्तनाने ते दृढ केले पाहिजेत या गटात पतिपत्नी, भाऊभाऊ, बहिणीबहिणी समवयस्क मित्र व सहकारी याचे सबध बरोबरीचे असतात त्याशी वागताना त्याच्या चुकास महत्त्व न देता त्याच्यावर अधिक अधिक प्रेम केले पाहिजे शिक्षक, गुरुजन, वडील माणसे अशासारखी जी वरिष्ठ ऋणानुबधाची माणसे, त्यास आदर दाखवून त्याचेपासून शिकण्याची वृत्ति मनात ठेविली पाहिजे घरातील लहान मुलेबाळे सरक्षण–सगोपन यासाठी आपल्या गटात आलेली असतात त्याच्यात पूर्वजन्मीची काही सद्गुणाची बीजे असतात आणि काही दुर्गुणाचीही असतात सद्गुणाच्या बीजास पाणी घालून ती वाढवावी व दुर्गुणाच्या बीजास खाद्य न देता ती खुरटतील असे करावे-- या धोरणाने वागून त्याचे सवर्धन करण्याची वडिलावर जबाबदारी असते पुष्कळ वर्षे आपली सेवा चाकरी करणारा जो इमानी नोकर असेल त्यास आपण पगार दिला म्हणजे आपले कर्तव्य सपले असे न म्हणता तो उत्क्रान्तीत मागे असलेला जीव आहे, त्याच्या उत्क्रान्तीस साहाय्य व्हावे यासाठी आपला त्याचा सबध जोडलेला आहे हे लक्षात घेऊन प्रेमळपणाने आपल्या वरिष्ठ पायरीचे गुण त्याच्यात निर्माण होतील अशा धोरणाने त्याच्याशी आपण वागले पाहिजे या जन्मी आपणासभोवती जर निकट सबधचे असे पन्नास स्त्रीपुरुष असले तर त्यातल्या पचविसाचे ऋणानुबध पूर्वीपासूनचे आहेत असे मानल्यास ते फारसे चुकणार नाही [१]

---

१ थिऑसफीय सशोधनावरून असे स्पष्ट दिसून येते की उत्क्रान्ति मार्गाने खनिज कोटि, वनस्पति कोटि, प्राणि कोटि या पायऱ्या

( टीप पुढील पानावर चालू )

( टीप पुढील पानावर चालू )

चढून जो जीव मनुष्य कोटीत प्रविष्ट झाला, त्याचे पुढचे जन्म मनु कोटीतच होतात, खालच्या कोटीत होत नाहीत. तेव्हा आप पुढच्या जन्मी दगडाच्या, झाडाच्या किंवा पशूच्या जन्मास जाऊ अ भीति कोणीही माणसाने बाळगण्याचे कारण नाही जीव हा मूल स्त्री नाही, किंवा पुरुषही नाही. त्याची उत्क्रान्ति सर्वांगीण व स तोल व्हावी म्हणून माणसाला अनेकदा पुरुषाच्या जन्मात व अनेक स्त्रीच्या जन्मात घालण्यात येते. पुरुषजन्मात एका प्रकारचे गुण सपा करणे सुलभ जाते, तर स्त्रीजन्मात दुसऱ्या प्रकारचे गुण सपादणे सुल जाते आणि हे दोन्ही प्रकार आवश्यक असल्यामुळे माणूस पुष्व जन्मांत पुरुष होऊन येतो आणि पुष्कळ जन्मात स्त्री होऊन येतो, गोष्ट थिऑसफीय सशोधनावरून निस्सदिग्धपणे दिसून येते अ शब्दांनी हे सागावयाचे असले तर असे म्हणता येईल की आज जो पु आहे तो मागल्या कित्येक जन्मात स्त्री होता, व पुढल्या कित्येक जन्म पुनः स्त्री होणार आहे. आणि आज जी स्त्री आहे ती मागल्या अन जन्मात पुरुष होती व पुढल्या अनेक जन्मात पुरुष होणार आहे ! !

---

## पुनर्जन्माविषयी

इंग्रजी राजकवि जॉन मेसफील्ड लिहितो–

I hold that when a person dies,
His soul returns again to earth;
Arrayed in some new flesh-disguise
Another mother gives him brith
With sturdier limbs and brighter brain
The old soul takes the road again
Such is my own belief and trust;
This hand, this hand that holds this pen,
Has many a hundred times been dust
And turned, as dust, to dust again;
These eyes of mine have blinked and shone
In Thebes, in Troy, in Babylon,
All that I rightly think or do,
Or make, or spoil, or bless, or blast,
Is curse or blessing justly due
For sloth or effort in the past,
My life is a statement of the sum
Of vice divulged or overcome

इंग्रजी कवि रुडयार्ड किप्लिंग आपल्या Sack of the Gods या कवितेत लिहितो–

. They will come back, come back again
As long as the red earth rolls
He never wasted a life or tree
Do you think, he would squander souls ?

## मराठी थिऑसफिकल फेडरेशननें प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| १. | थिऑसफीवरील सुबोध व्याख्यानें<br>भाषांतरकार कै. वा. दे. भा. लेले, बी. ए. | रु. आ.<br>०–१२ |
| २. | सिद्धपुरुष व त्यांचा संप्रदाय<br>ले वा ल. चिपळूणकर व रा. स. भागवत | १–१२ |
| ३. | हिंदु सामुदायिक पूजा (सार्थ व सटीप) ले. रा. स भागवत | ०– ४ |
| ४. | महम्मद पैगंबर व त्यांचा इस्लामधर्म–ले वा ल.चिपळूणकर | ०– ४ |
| ५ | मृत्यूनंतर काय ?–ले रा. स. भागवत एम् ए. | ०– ४ |
| ६. | ईश्वर आहे काय ?– ले. रा. स. भागवत | ०– ४ |
| ७. | थिऑसफी म्हणजे काय ? ले. रा. स. भागवत एम्. ए. | ०– ४ |
| ८. | साधनचतुष्टय– 'कृष्णजी' कृत 'At the Feet of the Master' चें मराठी भाषांतर | ०– ८ |
| ९. | जीवनाचा हेतु ले वा. ल. चिपळूणकर | ०– ४ |
| १०. | थिऑसफीत नवीन काय आहे ?<br>ले. वा ल. चिपळूणकर व रा. स. भागवत | ०– ४ |
| ११. | थिऑसफी व जनतेच्या दारिद्र्याची हकालपट्टी<br>ले. रा. स. भागवत | ०– ४ |
| १२. | श्रद्धा कीं चिकित्सा ?<br>ले. वा. ल. चिपळूणकर व रा. स. भागवत | ०– ४ |
| १३. | दिव्य दृष्टि कशी संपादन करतां येते ? ले. सी. डब्ल्यू. लेडबीटर<br>–अनुवादक श्री. अ. गो. कानिटकर B.A., B.E. | ०– ४ |

---

| | | |
|---|---|---|
| १. | बेझंट चरित्र–आवृत्ति २ री (१९४७) ले. रा. स. भागवत | २– ० |
| २. | राजयोगाचीं मूलतत्त्वें व अभ्यास–ले. रा. स. भागवत | १– ८ |
| ३. | मृत्यु व मृत्यूनंतर–ले. रा. स. भागवत एम्. ए. | १– ८ |
| ४. | स्वप्नसृष्टि–ले ज. ना. ढगे, एम्.ए. | १– ८ |
| ५. | महाराष्ट्रांतील संत व त्यांचे साक्षात्कार–ले. रा. स. भागवत | १– ८ |
| ६. | ईश्वर आहे कीं नाही ?–ले. रा. स भागवत | १– ८ |
| ७. | आपण पुनः पुन्हा जन्मास येतों काय ?<br>ले. रा स. भागवत | १– ८ |

### आगामी प्रकाशनें (प्रत्येकी किंमत १॥ रुपया)

✱ धर्म म्हणजे काय ? नीति म्हणजे काय ? तत्त्वज्ञान म्हणजे काय ?

✱ पुनर्जन्मसिद्धांत व त्याचें विवेचन.

वरील पुस्तकें पुढील पत्त्यावर चौकशी केल्यास मिळूं शकतील :–

**श्री. दत्तात्रय गोविंद काळे**, बी. ए., 'गोविंदभुवन' आपटे रोड, पुणें ४